# व ळ ण

मधु कुळकर्णी



साधना प्रकाशन, पुणें

# अनुक्रम

# वळण

माझ्या मित्राच्या ओळखीने मला उत्तम हवेशीर खोली मिळाली होती. तिथल्या घरमालकाला एक बारीक आवाजाची, कोवळी, छलाटी मुलगी होती. पलीकडच्या जाग्यात तिचे काका राहायचे. कुत्र्याचे भयकर वेड असलेली त्यानाहि एक परकरी मुलगी होती. ह्या बहिणी–बहिणी कधी कधी सध्याकाळीं कट्टयावर बोलत बसायच्या. धाकटी ‘ मुली ’ची प्रगति सागायची. ‘ पिटो ’ त्रास देतो म्हणून त्याच्यावर लटक रागवायची. आणि ‘ लिली ’ भूक लागल्यावर आपल्यावर गुरगुरून आपला परकर कसा ओढते ते दाखवायची. मग थोरली लहानस हसायची.

थोरली एक दिवस सिनेमा पाहून आली. दारातच धाकटीन विचारल,

“ ताई, कुठल्या सिनेमाला गेली होतीस ग ? ”

किरटा आवाज आला, " अबोली. "

" कसा काय आहे ? "

" बेस्ट आहे. पण रड्डू येत. "

त्यातल्या ' पण ' चे मला हसू आलं.

यानतर माझ कुठच लक्ष नव्हत. परीक्षा जवळ आली होती. अभ्यास जोरात चालला होता. शेवटी शेवटी तर फिरण बद केलं होतं. आघोळ, जेवण आणि अगदी थोडी झोप सोडून बाकीचा वेळ पुस्तकात जायचा. वातावरण तापल होत. त्याला जोराची गति आली होती ..

परीक्षेतून मोकळा झालो. चार दिवस निवात राहून मग गावी जायच ठरवलं.

दुपारी जेवण आटपून ती पिवळ्या अगाची मुलगी खारीसारखी टुणकन् आपल्या माडीवरच्या खोलीत यायची. माझ्या खोलीसमोरच तिची खोली होती. आल्याबरोबर दार लावून घ्यायची. चार पाच वाजता खालीं जायची.

परीक्षा सपल्याच्या दुसऱ्याच दिवशी दुपारी चार वाजता मला एक नवीन शोध लागला ! खोलीत गेल्यावर ती दार बद करते, पण पायाखाली खुर्ची घेऊन दारावरच्या लहानशा झरोक्यातून ती माझ्या खोलीत पाहात असते ! दोन दोन तास पाहात असते !

त्याच दिवशी सध्याकाळी मी विचारल, " सिनेमाला येणार का ? "

ती नाही म्हणाली !

रात्रीच सामानाची बाधाबाध केली. सकाळी हमाल बोलावला. त्याच्या डोक्यावर बॅग दिली. आणि त्याला पुढे चल म्हणून सागितल. घरच्या सगळ्या लोकाचा निरोप घेतला. फक्त तिला कटाक्षान वगळून निघालो.

तोपर्यंत ती बाहेरच्या फाटकाजवळ थाबली होती. खाली मान घालून मी तिच्याजवळून झटकन् रस्त्यावर आलो. समोर रस्ता लाबपर्यंत सरळ षेत पसरला होता. ताडताड रस्ता कापून दूरवरच बळण गाठलं. वळताना माग पाहाव अशी सूक्ष्म इच्छा मनात आली. खिशातल्या रात्रीच्या सिनेमाच्या तिकिटाबरोबर ती इच्छा चुरडून, भिरकावून दिली. आणि वळण संपवलं.

□ □ □

# भिंत

परसदारची भिंत धाड् धाड् कोसळली आणि पंत दचकलेच. गडबडीने ते उठले. दिवा मोठा केला. त्याची बायकोहि पाठोपाठ गडबडीन आली. पंत मागच्या सोप्यात आले. तिथूनच पाठीमागचा सगळा भाग उघडा दिसत होता. परसदारात दगडा-मातीचा ढीग झाला होता.

पंताची छाती दडपून गेली. जवळच बायकोहि उभी होती. ' शेवटी पडलीच तर .. ' अस म्हणून पंत आत आले. दिवा ठेवला. आणि ते ओट्यावर बसले. बराच वेळ गेला. ' फार वेळ झाला आहे, पडा आता, ' अस बायकोन सांगितल्यावर पंत सोप्यात घातलेल्या अंथरुणाकडे वळले. त्यांचीं चारहि मुल ओळीन झोपली होती. त्याच्याजवळच तेहि कलडले. कितीतरी वेळ भिंतीचाच विचार त्यांच्या डोक्यात फिरत होता. त्यांना झोपच लागेना.

भिंत केव्हातरी पडणार याची त्याना जाणीव होती. कारण कित्येक दिवसापासून ती खचली होती. खचलेली भिंत केव्हातरी पडतेच हे गणित पताना माहीत होत. तरीपण प्रत्यक्ष मातीचा ढीग पाहून आपणच त्याखाली सापडलो आहोत अस त्याना वाटू लागल. पत गुदमरले शेजारी झोपलेल्या मुलाचा हात त्याच्या अगावर पडला. त्या मऊ हातान पताना बर वाटल. त्याच्यातला हळवेपणा चाळवला गेला. आणि त्याना धीर आला. त्यानी विचार केला, आपणच खचून जाता उपयोगी नाही. मग या मुलानी काय करायच ? या मुलाच्या आईन काय करायच ? आपली बायको अजूनहि जागी आहे अस पताना वाटल. या विचारातच त्याना केव्हा झोप लागली ते त्याना समजल नाही.

नेहमीप्रमाणे पत लवकर उठले. मुलाच्या अगावरचे पाघरुण नीटनेटक केल. आपल अथरूण गोळा केल. त्याची बायको आधीच उठली होती. स्वयपाकघरात तिच काम चालल होत. पत बाहेर आले. दरवाजाची कडी काढून तो उघडला. परसदार पडल तरी दरवाजा अजून शाबूत आहे याचच त्याना समाधान वाटल ! न्हाणीत जाऊन त्यानी तोड धुतल. बायकोनं दिलेला चहाचा कप घेतला. गरम गरम चहाचा घोट घशाखाली उतरवून पतानी कपबशी कट्ट्याजवळ ठेवली. घागर घेऊन ते बाहेर पडले.

पताची सगळी मुल उठली. तोड धुवायला परसात गेली. बाहेरचा सगळा प्रकाश आत आलेला पाहून त्याना गमतच वाटली ! पाठीमागचा शाळेचा रस्ता चक्क घरातूनच दिसत होता. आता त्याना पुढील दारान जाऊन, वळसा घेऊन, शाळेला जाव लागणार नव्हत. रामच्या घरी आता सहजासहजी जाता येणार होत. धाकट्या बब्रून आईला विचारल,

" आई, ही वाट कुणी पाडली ग ? "

पतानी पाणी भरल. म्हशीला वैरण घातली, आणि धारेचा ताब्या घेतला. मुलाना दूध दिल. बाकीचा ताब्या स्वयपाकघरात नेऊन ठेवला. आणि बायकोला त्यानीं स्वयपाक लवकर करायला सागितला. आज त्याना इस्लामपुरला जायच होत. कचेरीत तारीख होती. आज पत मुलाच्या बरोबरच जेवायला बसले. मुलं जेवल्यावर शाळेत गेली. पंतानीं कागदपत्र घेतले, आणि इस्लामपुरचा रस्ता धरला.

आजच कचेरीतल काम सपायला फार वेळ लागला. तिथच दिवस मावळायला आला. पत परत निघाले. कितीहि वेळ झाला तरी आज त्याना घरी जायलाच हव होत. कारण मागची भित गेल्यान घराची सुरक्षितता सपली होती. दाण्याची चार पोती आणि चारदोन भाडीकुडी कुणी नेली की सपलच झाडाखाली राहिल्यासारखाच प्रकार ! या विचारानी पत बावरून गेले. आणि त्यानी झट्झट् पाय उचलायला सुरुवात केली...

मागच्या केसचा त्याच्या उलट निकाल लागला होता. सगळ खर असून सगळ उलट झाल होत म्हणून या केसमध्ये पतानी जिवाचा आटापिटा केला होता पळापळीत, कोर्टकचेरीच्या कामात का यश येत नाही हे त्याना समजत नव्हत आपल्या शेजारचाच विठोबा आण्णा नेहमी केसीस जिकतो. तो आपल्यासारख्याच स्वस्थ असतो. पण त्यान सगळ काही व्यवस्थित करून ठेवलेल आहे. राजिनामे घेतलेले आहेत. नोंदी आपल्यासारख्या करून घेतलेल्या आहेत गोविदरावाची गोष्ट अगदी उलट आहे जमीन मागितली की त्याची कुळ त्याला सागतात,

"जिमनीत पाऊल तर घाल. तोडतोच तुला !"

या विसगतीमधील दुवा समजण्याइतकी पताची बुद्धि तीव्र नाही. हा दुवा हुडकून काढण्यासाठी ते विचार करू लागले की, त्याचे विचार हेदकाळतात. त्याना हिसके बसतात या कोलाटीतून निघण्यासाठीच त्यानी आपल्या खाऱ्या मळ्याच्या वाटेकऱ्याला जमिनीबद्दल भीत भीत विचारले होते. त्यावर आनदा देसाई पटका काखेला मारून तबाखूची पिचकारी मारीत साळसूदपणे म्हणाला होता, "तुमची जिमीन आमाला काय करायची ? तुमी नीग म्हटल्याबरोबर निगायची माझी तयारी. पन त्यापाय कचेरीतच कशाला याया व्होव ?"

दुसरे दिवशी पतानी चहा घेतला. काल कामामुळ भितीचा विचार करायलाहि त्याना सवड मिळाली नव्हती. म्हणून ते बाहेर पडले. शिदू गवड्याला त्यानी बोलावून आणल. शिदून भितीचं 'इष्टिमेट' केल. साधारणपणे तीनशे रुपये खर्च येणार, होता. कामाला केव्हा येऊ म्हणून शिदूनं विचारल्यावर 'पुन्हा सागतो', म्हणून पतानी चालढकल केली.

अशी कितीतरी दिवस पंतांना उद्याची वाट पाहावी लागली. पडलेला मातीचा ढीगहि घट्ट बुजून राहिला. तिकडूनच लोकाची येजा होऊन पायवाट पडली...

मुलांच्या परीक्षा सपल्या आहेत. त्याची बायको मुलाना घेऊन माहेरीं गेली आहे. आता पत घरात एकटेच राहिले आहेत. दुपारचा वेळ आता पताना असह्य होतो. ही वेळ दोन्ही टोक हातात धरून कोणीतरी ताणत आहे अस त्याना वाटत. बाहेर रखरखीत ऊन पडलेल असत. समोरची नदी दुपारच्या वेळेला अगदी स्तब्ध असते. चित्रातल्या नदीसारखी. एखादं दमलेल कुत्र पंताच्या दरवाजात येऊन जीभ बाहेर काढून धापा टाकत. त्याच्या जिभेतून लाळ गळते. पताना त्याची किळस येते. पण ते त्याला घालवून देत नाहीत. म्हैस बाहेर गेलेली असते. रेडकाला वैरण टाकून, त्याला पाणी पाजून, काहीतरी चाळा करीत, पत ताणलेला वेळेचा रबर ओढून आकसून घेण्याचा प्रयत्न करतात मग थोड उन्ह कलत आहे अस पाहून ते रानात वैरण आणायला जातात आता त्याना वैरण स्वतःलाच काढावी लागते स्वत. बाधून स्वतः डोक्यावरून आणावी लागते पूर्वी त्याचा वाटेकरी आणून टाकीत असे. कोशा बाधलेला त्याचा वाटेकरी उशीरा रानात येतो. खुरप हातात घेऊन उगीचच्च रानातून हिंडतो कामात असल्याचा आव आणतो. त्याला काही बोलायचंहि पताच धाडस होत नाही. कारण परवाच त्यान एकाचा बदुकीन गोळ्या घालून खून केला आहे. त्याच धड फरफटत आणून उबऱ्यावर ठेवून कडबा तोडल्या-सारख कुऱ्हाडीन तोडल आहे आणि हे सगळ त्यान ऐटीत पचवल आहे !

पत वैरणीचा भारा डोक्यावर घेऊन घरी येतात. घरी जोत्याजवळ तो भारा जोरात फेकून देतात. पताच आता वय झालेल आहे. त्याना आता काम होत नाही. दम लागतो. पण त्याच काहीच चालत नाही.

रात्रीं पंताना कितीतरी वेळ झोप लागत नाही. सगळीकडे सामसूम असते. अधाऱ्या घरात ते एकटेच आथरुणावर पडून असतात. मागच्या भितीचे राहिलेले लपके पडत असतात. रात्रभर माती पडत असते. पंताना काहीच सुचत नाही. पत मग खूप खूप विचार करतात. अलीकडे त्याचं

उत्पन्न नीट येत नाहीं. सरकार भयकर कायदे करतं आहे. त्यापूर्वी आपल्याला काहीतरी करायला हवं; नाहीतर सत्तावन्न सालात आपली सगळी जमीन जाईल. सगळीकडे असंच बोलल जात आहे. पताना तशी वीस एकर जमीन आहे, पण त्याची कुळ आता ती सोडायला तयार नाहीत.

खरोखरच पताना वीस एकर जमीन आहे. या जमिनीमुळच एका चागल्या घरची मुलगी त्याची बायको म्हणून या घराचा उबरठा ओलाडून आत आली होती आणि या घरात सगळीकडे भरून गेली होती. कोनाड्याकोनाड्यात तिच खदखदणार हस भरून राहिल होत. पताना शिक्षण नाही. कामधदा नाही. धान्यान भरलेल्या घरात चिमुकली पिवळी पावल हालचाल करू लागली तेव्हा याच घरान तृप्तीचा ढेकर दिला होता. आजोबाच्या कारकीर्दीत हेच घर ताठ मानेन सगळीकडे नजर ठेवीत होत. वडिलाच्या कारकीर्दीतहि याच्या मानाची नौबत झडली होती. आज मात्र आपण याची मागची भितहि बाधू शकत नाही. रात्रभर चाललेली घराची कुरकुर ऐकूनहि आपल्याला गप्प बसाव लागत आहे, अस पताना वाटत. पताना वाटत, आपण नालायक आहोत, अगदी नालायक आहोत. आणि त्याच्या डोळ्यात पाणी येत. घळघळून येत. बराच वेळ पत स्तब्ध राहतात... पण पुन्हा पताना वाटत राहत, खरोखरच आपण नालायक आहोत का ?

आपण शिकलो नाही म्हणून पताना फार वाईट वाटत. पण शिक्षण सपवूनहि काही माणस हालात का आहेत याच कोड पताच्या भाबड्या मनाला सुटत नाही. आपल्या आयुष्याच्या सुरुवातीपासूनचा पत विचार करतात. त्यात कुणालाहि दुखविल्याच त्याना आठवत नाही. शेळीसारख त्याच आयुष्य गेलेल आहे. ज्या जमिनीवर आपले वाडवडील जगले त्याच घरात आपण आहोत. पण लहान लहान मुलसुद्धा काही काही बोलत असतात. काम केल्याशिवाय पोटाला मिळण्याचे दिवस आता नाहीत. पण या वयात काय काम करायच, असं पताना वाटत राहत. पत हबकून जातात. आपली चाळिशी उलटून पाच सहा वर्षं झाली. एक वैरणीचा भारा आणला तर डोळ्यापुढ काजवे चमकतात. मुल लहान लहान. थोरला अरू बारा वर्षांचा. त्याच शिक्षण कसं करायच ? पुढच्या शिक्षणाचा खर्च

म्हणजे हजाराहजाराचा. आणि आता मी काय काम करायच? कसं करायच? त्याना काहीच समजत नाही.

'आम्ही शेती करतो' म्हणूनहि जमीन ताब्यात मिळत नाही, याला कारण काय हेहि पताना समजत नाही. त्याच्या गावातील बऱ्याच गोष्टी पताना समजत नाहीत. कडबा तोडल्यासारखी माणस तोडूनहि आपल्या वाटेकऱ्याला शासन मिळत नाही याच कारण पताना समजत नाही. चावडी-जवळ साळुख्याची गिरणी चाललेली असते. म्हादा रामोशी त्याच्याजवळ दारूसाठी बारा आणे मागतो. फक्त बारा आणे मागतो. पण तत्त्वाचा प्रश्न म्हणून दारूसाठी पैसे देण्याचे साळुखे नाकारतो. 'थु तुझ्या—गिरणी माझीच आणि मला पैसे नाही म्हणतोस?' अस म्हणून म्हादा रामोशी जवळ पडलेला भला मोठा दगड गिरणीवर घालतो. तरीहि त्याला कुणी काही कस करू शकत नाही हे पताना समजत नाही. खाद्यावर बदूक घालून मिशीला पीळ भरीत कुणीहि कुणावरहि का गुरगुरतो हे पताना समजत नाही. ज्ञानू साठे अगदी गरीब माणूस. पण आता त्याची सारखी गडबड चालू असते. गुऱ्हाळ नाहीतर गूळ शोधण्याच्या धावपळीत असतो तो. हल्ली तो रोज कमीत कमी पधरा रुपये मिळवितो म्हणे. पण त्याचा हा उद्योग अगदी राजरोस कसा चालतो ते पताना समजत नाही.

पण पताना रोज पधरा रुपये नको आहेत. आतापर्यंत चालत आलेल आयुष्य असच चालाव एवढीच त्याची इच्छा आहे. आतापर्यंत चालत आलेल्या छोट्याशा जमिनी सरकार म्हणे काढून घेणार आहे. खरच, राजा अस कधी करील का? पताच्या भाबड्या मनाला यातल काहीच कळत नाही. त्याना एकच कळत. बाहेर लोकाच नेहमी चाललेल उलट-सुलट बोलण फक्त ऐकणं. पण त्याचा सुसगत अर्थ लावण हे पताच्या बुद्धीच्या कक्षेच्या पलीकडच आहे. या बाबतीत आपण फार अज्ञानी आहोत. आपल्या आणि जगाच्यामध्ये फार मोठ्या भिती उभ्या आहेत अस पताना वाटतं. हा तट फोडून याच्यात जाऊन मिळाव हे त्याना शक्य वाटत नाही. पताना काहींच शक्य वाटत नाही. काहीच समजत नाही.

त्या विचाराच्या जाळ्यात अडकलेले असताना मागीलदारी एखादा

मातीचा रबका पडला कीं ते शुद्धीवर येतात. मग मात्र त्याना एक गोष्ट निश्चित समजते की, ही भित बाधली पाहिजे. विचार करून त्याच डोक जड झालेल असतं. पिजून गेलेल असत. ' झुन् ' असा आवाज ऐकू येतो आहे अस वाटत राहतं. याच वेळी आपल्याला झोप यावी अस त्याना फार वाटतं. आणि झोपता झोपता ते पुनः पुन्हा ठरवितात की, काहीहि करून ही भित उद्या बाधायला ध्यायची. अगदी ध्यायचीच...

□ □ □

# फेरी

आपली सायकल पत उबऱ्यावरून उचलून वाड्यात घतात आणि दहापाच कोंबड्या फडफड करीत पळापळी करतात. पत उगीचच अग चोरून घेतात. शहारल्यासारखं करतात. सायकल ढेलजत भितीला टेकून ठेवतात, आणि डोक्यावरची टोपी काढून एका हातात घेऊन दुसऱ्या हाताने कपाळावरचा, डोक्यावरचा घाम पुसतात. सोप्याला त्याचा वाटेकरी माडी घालून खांबाला टेकून बसलेला असतो. बसल्या जागेतून पतांना ' याऽऽ ' म्हणतो; आणि पत परक्यासारखे आत जातात. घोंगडे टाकण्यासाठी वाटेकऱ्याची बायको, सून, मुलगी, सगळेजण उगीचच धावाधाव केल्यासारखं करतात. पण घोंगडी कांही लौकर सापडत नाही. वाटेकऱ्याची म्हातारी आई मग सगळ्यावर खेकसल्यासारखं करते, आणि मग एक गोणपाटी पोतं

एका खांबाशेजारी अस्ताव्यस्तपणे टाकलं जातं. खर म्हणजे त्या तेलकट आणि भोसके पडलेल्या पोत्यावर बसायची पतांची इच्छाच होत नाहीं. पण यातलं चेहऱ्यावर काहीच न दाखविता पंत अगदी अपरुपाईनें त्या पोत्यावर टेकतात. सबध सोप्यावर कडीपाटाकडे, आतल्या स्वयपाकघराकडे नजर टाकतात. जिन्यातल्या दाराकडे त्याचे लक्ष जाते. जिन्याच्या चौकटीची दोहिहि दारें कणसासकट काढून बाजूच्या भितीला टेकून ठेवलेली असतात ! वर्षानुवर्षे तेलपाणी खाल्लेल्या कडीपाटात अनेक भोकं पडून त्यांतून पिवळट पीठ बाहेर आलेले असते. चेहरा दिसावा इतक्या गुळगुळीत काचेसारख्या भिर्तींना सुरकुत्या पडलेल्या असतात. एखादा-दुसरा बर्गा निसटलेला असतो तुळयाच कबर मोडलेली असते. स्वयंपाकघराच्या दारातील देवघराचा पत्ताच नसतो ! घराची बाकीची रया गेल्यापेक्षा देवघराची अवस्था पताना पाहव नाही. कलियुगात देवच डोळे झाकून बसलेला असतो असे म्हणतात, तेच पताना मग खरे वाटते. आतल्या अधारामुळे उघड्या दाराचा डोळासुद्धा स्वयंपाकघराने झाकून घेतल्यासारखे वाटत असते. पण पत कशाबद्दलच काहीच बोलत नाहीत. ते उगीचच उठतात आणि स्वयंपाकघरातून कळकट भाडी आणि भाकरीच्या बुट्ट्यातून वाट काढीत पडवीला येतात. पडवीच्या चारहि भिती पडलेल्या असतात. आडाचा कठडा सारखे आत वाकून पाहिल्याने घेरी येऊन आत कोसळलेला असतो. आणि शेजारचे पारिजातकाचे झाड काळजीने वठून गेलेले असते ! अगदी आडालगतच्या साडपाण्याच्या दगडाजवळचे झाड मात्र चागले दोन पुरुष झपाट्याने वाढल्यामुळे बिनओळखीचे वाटत असते. पण त्याला एकहि नारळ लागलेला नसतो. ईशान्येकडला भितीचा कोपरा पडलेला असतो. आणि त्यातून चक्क माळ्याच्या घरापुढला रस्ता दिसत असतो ! वाड्याच्या संरक्षणालाच असा धक्का लागल्याचे पाहिल्यावर मात्र पत चाचरत शब्द उच्चारतात,

" ऑ ! ही भित केव्हा पडली ? "

पताच्या पाठोपाठ असणारा त्याचा वाटेकरी गेल्या पावसाळ्याला दोष देऊन मोकळा होतो. आणि चार महिने पाठीमागे लागूनहि गावातल्या गवंड्याला कसा माज आलाय् त्याचे वर्णन करतो—

पंताना मग बराच वेळ वाटत राहत, की आपला वाडा फार लौकर म्हातारा झाला. पण याबद्दल उघडपणे काहीहि बोलण्याचें त्याचे धाडस होत नाही. फार वेळ त्या वाड्यात बसावसहि त्याना वाटत नाही. म्हणून मग मळ्याकडे फेरी मारण्याच्या उद्देशाने पंत उठतात पाठोपाठ त्याचा वांटेकरी उठतो आणि मग पंत सायकल तशीच हातात धरून वाटेकऱ्या-बरोबर चालतच निघतात वाटेत आण्णा पाटलाचा वाडा लागतो. उघड्या अंगान आण्णा पाटील अंगणातल्या माचावर बसलेला असतो. पंताना पाहिल्यावर बसल्याबसल्याच तो जोराने साद घालतो,

" काय पंत ! लई दिसान येन केलं ? "

" आलो होतो मळ्याकड. म्हटल जाव फेरी मारून. "

आण्णा पाटील आणखी काही बोलण्याच्या आत पंत तिथून सटकायचे पाहतात. कारण आण्णा पाटील गावातला एक पुढारी असतो. आणि पुढाऱ्याशीं कुठल्याहि कारणाने बोलत बसायची पंताची तयारी नसते. म्हणून पंत पुढे चालायला लागतात. रस्त्यावर आता कुणीच नाहीं असं पाहून पंत आपल्या वाटेकऱ्याला विचारतात, " काय म्हणतायत यंदा पिकं ? "

आपली पिकं यंदा अगदी सोळा आणे आहेत असं जगातला कुठला शेतकरी म्हणतो की नाही कुणास ठाऊक ! त्याच्या नेहमीच्या पद्धतीनं त्याचा वाटेकरी म्हणतो,

" आवंदा सम्दीं पिकं आक्षी सोळा आनं हुती. पाऊसकाळ कसा मागितल्यागत हुता. पर ह्या महिन्याभरात पान्याचा ठिप्पूस न्हाय. वावरातनी सम्दी भडुळीच. गुडगा-गुडगाभर पाय जात्याती. पाक करापलीं पिकं. "

गेल्या वर्षी जरा शितोडे जास्त झाले तर वाटेकऱ्याचे शब्द पंताना अजूनहि आठवतात. तो म्हणाला होता,

" पाक मुळ्या कुजल्या. योट योट उटिवला ह्या पावसानं—"

आत्मा पहिलवान वाटेंतच भेटतो. अगदी वरवरच बोलतो,

" काय पंऽत ! एरवाळी पायाशिकल ! "

पंत गडबडीनं उत्तर देतात, " जातों जरा मळ्याकडं."

" लई लाम असताय म्हन तकड नगराकड ? "

" होय, बाबा, घालतील तिकडे जाव लागत. नोकरी आहे नं ? "

" त्तकड पाऊस पानी कसा काय ? "

" आहे आपल्याकडल्यासारखाच. या महिन्यात काही पाऊस नाहीं तिकडे. "

" मजी सम्दीकडच बॉम्ब हाय म्हना की—"

धोंडिबा नायकुडे दारातूनच पंताना साद घालतो, " या ऽ ऽ पंत " पंत घाईत असल्यासारखे म्हणतात, " जाऊन येतो की जरा शेताकड. "

" जाचिला की, या –च्या तरी घेचिला–"

" नको नको आता. लौकर जाऊन यायला पाहिजे. "

" आस कुटं झालया ? कवातरी पायधूळ झाडायची आन् आस वाऱ्यागत निगायच हे काय खर हाय ? बसा. झालायच च्या. "

पंताचा नाइलाज होतो. आणि सोप्याला आथरलेल्या घोंगड्यावर पंत बसतात. आत चहासाठी बरीच धावपळ चाललेली त्याना दिसते. धोंडीबा पंताना विचारतो,

" आता कच्या कामाव हैसा ? "

" शाळा खात्यात आहे मी सध्या. "

" मजी दिपुटी म्हना की ! साळवच सायब म्हना–'

" हो हो. तेच. "

" कुनीकड हाय आता ? "

" तिकडे नगर जिल्ह्यात असतो मी हल्ली . "

" छाऽ–मजी लई लाम ! हाकड याचबीच काय–"

" तस काही सागता येत नाही. पण केव्हातरी एकदा यायला मिळेल की या भागात. "

" पर हाकडल्या भागातलीं खात्यातली मानस वळकिची असत्याल की ? आमच्या बाळासाबान टाकलावता कागूद. एकडाव गेलावताबी. पर आजून हुकूम न्हाई. तवा तुमच्या सागन्यातलीच मानस आसनार तत. वाइच बगा की—"

" अस होय ! इटरव्ह्यू किती तारखेला झाला ?"

" हायत वायच् बगून बगून. हुतिल्या औदा तुमास्नीबी चट्नीपुरत्या आन् आमास्नीबी चट्नीपुरत्या—"

दोन एकर मिरच्याच पीक मनासारख आल्यावरहि आपल्या वाटेकऱ्याच हे एस्टिमेट कस तयार झाल आहे, हे पताना कळत नाही. शिवाय आपल्याला घरात महिन्याला शेराची चटणी पुरते आणि आपल्या वाटेकऱ्याला महिन्याला दोन पायली लागते, तेव्हा याचा मेळ कसा बसवायचा तेहि पताना कळत नाही ! हळदीतला मका तरारून आलेला असतो ते पाहून पत म्हणतात,

" कणस बरी दिसतायत हळदीतली—"

त्याचा वाटेकरी कणसाकडेच पाहात, पण तोंड वाकडे करीत म्हणतो,

" नदारतिया एकादी किरळी कुट कुट. "

एकेका ताटाला दोन–दोन तीन–तीन सणसणीत कणसे पडलेली असताना आपला वाटेकरी एवढा निराश का हेहि पताना कळत नाही !— वाऱ्यावर डुलणारे कडवाळ पाहात पाहात पत पुढे चालत असतात. एवढ्यात शेजारच्या रानात तण काढीत असलेला आप्पा शेलार पताना पाहून उठून उभा राहतो. आप्पा शेलार नावाप्रमाणेच शेलाट्या अंगाचा, उभट चेहऱ्याचा, लाबट नाकाचा आणि गोरेपणामुळे नेहमी नितळ वाटणारा असा असतो. हात वर करून तो म्हणतो,

" रामराम पत. लई दिसानी येन केल ? "

" रजेवर आलो होतो. म्हटल येऊन जाव गावाकड. "

" बर केलसा. आव, मालकाची नदार आसली मजी करद्याला बर आसत ! " शेलाराच्या या अनाहूत उद्गारामुळे पताचा वाटेकरी उगीचच तोंड वाईट करतो ! पत तिकडे लक्ष न दिल्यासारखे करतात. शेलारला विचारतात, " काय म्हणतायत् पिक ? "

" औदा पत, जुदळा दिष्ट लागायगत हुता बगा. दान ठेवाया घरात जागाच ऱ्हायली नसती. पर ऐन टिपनाला आबाळच इदाळल. आक्षी गच्चात आडाकल बगा— "

पीक जोशात उभ असताना अस विधान करून आप्पा शेलार मघाचें

बोलणे सुधारण्याचा प्रयत्न करतो आहे, असे पत समाधान मानून घेतात. आणि पुढे होतात—

चपातीची आवड पताना लहानपणापासून असल्याने ते वाटेकऱ्याला विचारतात,

" यदा खपली केली नाही होय ? "

" एरवाळी लई झिरापल. जत–तत आबाळ लोबायच. घातच आली न्हाई खपली पेराय ! "

हे कारण निर्विवादपणे पटलेले नसताहि पत गप्प बसतात. उसाचा फड समोर आल्याने त्याचे लक्ष तिकडे वळते. काळेभोर पीक कळकासारखे रान उठवून उभे असते. तेव्हा न राहवून पत म्हणतात,

" यदा ऊस मात्र बरा आहे ह. "

" ऊम हाय बरा. पर दर काय घावल तवा. त्याशिवाट औदा जळान सम्द इकतच ध्याया व्होवं, ताग मुजिवला. आत्ताच चाळसान गाडी म्हणत्यात फोल— " या बाबतीत पत परमेश्वरावर हवाला टाकून मोकळे होतात—

बराच वेळ झालेला असतो. ऊन तापायला लागलेल असत. म्हणून पत वाटेकऱ्याला भाजीबिजी तोडून पिशवीत घालायला सागून वाड्याकडे यायला सागतात. आणि आपण पुढे होतात-गावातून जात असतानाच रोमऱ्या रोम झालेली गुरवाची पार्वती त्याच्या समोरून येते. पताना पाहिल्यावर पदराचा घोचा करून नको इतकी लाजते. केवळ तिच्या य लाजेमुळे पताना तिच्या आईच्या तोडचे, पूर्वीचे गाणे आठवते. " पारबत्त आमची, बसली ग न्हायाला—" पण अशा वेळेला पताच्या पाठील कधीहि डोळे नव्हते !—

पत वाड्यात येतात. त्या वेळी बाहेरच्या ढेल्यात चार सहा माणसे तंबाख ओढीत बसलेली असतात. त्यातला गणू साठे घाईघाईने उठून पताना जाग करून देतो. भितीला टेकून पत मळ्यातून येणाऱ्या वाटेकऱ्याची वाट पाहात राहतात. पण बोलघेवडा गणू साठे त्याना तसा गप्प बसून देत नाही चवड्यावर बसून हळूच जवळ येत, आवाज थोडा बारीक करून तो पतान कानगोष्ट विचारल्यासारखी विचारतो,

" पत कुळकायद्याचं काय मागं घेनार हैती म्हनत्यात ? तवा खरं खोटं काय, तुमास्नी ठाव असायच–वरच्या लोकाल्नी तुमच फिरन आस्तया. तवा तत काय म्हनत्यात, त्यातल काय ? आमाला तरी काय ठाव पंत. खालच्या आळीचा सकऱ्या—त्यो जरा सराकलाय म्होर. लिवन्यात. त्यो बसतो सोसायटीच्या हापिसात, वर्तमानपतार वाचीत. त्यो वाचून दावतो काय बाय. आन् तुमास्नी ठाव हाय पत. मी कशात असतो का ? आपल श्यात बर आन् आपुन बर. आमचा धाकला गडी–शिरपा–त्यो आस्तो सकऱ्याच्या सग कवा कवा. आपला शिनव्या हाय त्येचा. तवा त्यो सागत हुता. कुळकायद्याच माग घेनार म्हनत्यात. सबाबिबा लई मोट्टी झालिवती. लई मानस काय बाय काय बाय, बोलत हुती. पर पत, तुमास्नी ठाव हाय. तसल्या सबला मी न्हाई नदर पडायचा. पर मानसच लई काय बाय म्हनत हुती—तवा तुमास्नी काय कानगोष्ट ठाव असायची—तवा म्हनल त्यातल काय—पदरा एकराच्या आत कायदाच लागू न्हाई म्हनत्यात. पर पदरा एकरावची जिमीन काढून घ्याची म्हनत्यात. तवा खर खोट काय दकल आसलच की तुमास्नी ? "

—अगदी नको असलेला विषय नेमका समोर आलेला पाहून पत बिचकतात. निखालस खोटी थाप पचण्याइतके हे लोक आता अज्ञानी राहिलेले नाहीत याची पताना जाणीव असते. आणि वकिलापेक्षा या लोकाना कायदा आता चागला माहिती झाला आहे, याची खात्री असल्याने पत चाचरत बोलतात,—

" त्याच काही नक्की सागता येत नाही. आणि बहुतेक, अगदी पूर्वी-सारखा हा कायदा पार बद होण्याची शक्यता कमी आहे. "

" पर पत, हे आस दुसऱ्याच घेटल्याल लईदी टिकायच न्हाई. कुनाचाबी सराप चागला न्हव बगा पत—आन् निवडून यापायी हे सम्द घोळ हाइती. फुडाऱ्याच्या कलागती लई झाल्यात्या बगा—मला तरी काय ठाव पत ? सक्या खटकुळा म्हनत हुता. लई जनाच्या जिमनी जायाच्या आता म्हनून–"

विषय बदलायचा म्हणून पत मध्येच विचारतात,

" सखोबाच बर आहे का रे आता? मध्ये जास्त झालं होत म्हणे त्याला–"

" मस्त पोरावानी तरातरा पळतुया रानापातुर ! त्याला काय हुतंय !"

" त्याच वय काय असेल रे आता ? "

" परटाचा देन्या, जोतीबाच्या देवळाम्होरली दगडाची गुडी खाद्याव घेऊन टकुरीवरन टाकत हुता, तवाच्याला सक्या साळला जात हुता बगा–"

वाटेल तितका विचार करूनहि सखोबा खटकुळ्याच्या वयाचा अदाज यावरून काहीं पताना बाधता येत नाही. पण तरीहि त्याची नक्की जन्मतारीख समजल्याचा आविर्भाव पत बळेच चेहऱ्यावर आणतात.

बाहेर रस्त्याच काम चाललेले असते, आणि विजेच्या दिव्याचे डाब बसविणारे लोक काम करीत असतात. पत गणबाला विचारतात,

" सगळीकडे डाब बसले का रे ? "

" फिरलय इजाट सम्दीकड. नागऱ्याच्या घोड्यापसन ते थेट परटाच्या दारापातुर दिव आल्याती. कडचा डाब परटाच्या दारातच आलाया. तवा वरल्या आळीचा पाटील बुडका खवाळला. च्यायच परीट, आन् त्येच्या दारात डाम ! सम्द्या घराम्होर डाम पायजेति. न्हायतर आमाला इजाटच नग. आशी जवा सम्द्यानी घाई घेटली तवा इजाट फिरल बोळाचोळातन—"

त्याच्या या ईर्षा, ही जिद्द, पताना काही नवीन नव्हती.

एवढ्यात पताचा वाटेकरी भाजीची पिशवी घेऊन परत आलेला असतो. पतानी उठण्याची घाई केली. गणू साठे आपुलकीचे सोग आणून म्हणाला, " सकाळच्यान काय खाल्लया का न्हाई ? तुमच काय आमच्यागत हाय ? जेवान हुयाच ध्या–दुपारा–पर काय तरी पोटात घातल आसल म्हना—"

" तस खाल्लय थोड. आणि जाईन आत्ता सायकलीवरन— "

अस म्हणून पतानी सायकल बाहेर काढली. पताचा वाटेकरी आणि त्याचा भाऊ बाहेरपर्यंत त्याना घालवत आले. दोघेहि एकदम म्हणाले,

" जगू वाचू या आन् आसंच च्छाल्र या. "

आणि त्याच्या वाटेकऱ्याने सागितले, " आन्, मोरूकाकाला दकल द्या. आदनंमदन फेरी टाकत जावा म्हनाव. आमालाबी घोर नसतो— बराय— "

अस म्हणून पताच्या वाटेकऱ्यानं हात जरा उचलल्यासारख केलं. एक

वर्षांची निश्चिती झाली हा भाव स्पष्टपणे त्याच्या तोंडावर प्रतीत होत होता—

पताची सायकल वेगाने निघाली. जरा दूर आल्याबरोबर पाठीमागे कुणीतरी बोलले, " बामन का आल्ता ? " पण पत ऐकून न ऐकल्या-सारखे करून जोराने सायकल सुरू करतात. लौकरच गावाबाहेर येतात— रस्त्यालगतच यशवत गुडाच्या मळ्यातल छप्पर होत. छपरा-बाहेरच यशवता काही किडूकमिडूक करत होता. पताना पाहून त्याने मोठ्या प्रेमाने हाक मारली. यशवता पताचा वर्गमित्र. दोघे एकत्र अभ्यास करीत, एका बाकावर बसत. पताना पोहायला त्यानेच शिकविले होते— पतानी सायकल आत घेतली—

" लई दिसानी आलास रगू—बस. गावाकड कवास आलतास ? "

" सकाळीच आलो होतो. बर, तुझ कस काय चालल आहे ? "

" बेस चाल्लय. " अस म्हणत त्याने आत वळून बायकोला धार काढायला सागितली. पत म्हणाले, " आत्ता धार कसली ? "

" आर, रगू, घरची रेडी हाय. कवाबी दूध देती शेरडावानी, दूदच पिऊन जा. च्या नग पिऊस— "

एवढ्यात एक लहान पोर आतून बाहेर आले. तेव्हा पतानी यशवताला विचारले,

" काय काय मुल आहेत रे आता तुला ? "

" त्याला काय तोटा न्हाय रगू ! चार पोर आन् एक पोरगी. थोरल दोग जात्यात साळला. त्यो मदला. त्येला घातलाय तालमीत. त्येच्यासाटीच म्हस पाळ्ळिया न्हव— धाकला हाय न्हानच. आन् पयल्या दोघाच्या पाटची ती पोरगी. "

एक गोरेली किडकिडीत पोरगी म्हशीला वैरण टाकत होती. मधलें पोर मात्र गट्टीसारखे बाधीव होते आणि आपल्या बापाची आठवण करून देत होते. यशवता केवढा धिप्पाड दिसायचा लहानपणीं. गोरापान रुद छातीपाठीचा यशवता उघडा होऊन विहिरीत उतरला म्हणजे सबध विहिरीत उजेड पडल्यासारखा वाटायचे.

" बर पन्, मुला काय मुलं हाइती ? "

" दोन मुलगे आणि एक मुलगी आहे बघ. "

" तुमा लोकाच काम लई बेताशिर असतया !—वयनीस्नी घेऊन आलायस काय ? "

" नाही बाबा. लगेच जाणार आहे परत. बर, पण, येसबा, तुझ बरं चाललय न ? "

एकदम हळवा आवाज करून यशवता म्हणतो,

" बर हाय रगू, पर मानस लई बदाल्ली बग. याक याक आकरित घडतय रगू, दिस लई वगाळ आल—मानसाची भावनाच बदालली. सोना वान्याचा बारा एकर मळा, पोलादागत दोन हिरी हैत, तुला ठाव हैच रगू, मापटभर दान देत न्हाइती वान्याला. परवा वानी आलावता. टाचा घासत हुता——रगू, लई वगाळ दिस आल बग ! आपल्या येळगत काय काय न्हायल न्हाई. उगा मी आपला हत वरती ठोकून बसलुया म्हनून तुला हे दिसतय सम्द. रगू, मी गावात सुदीक जात न्हाय कवा. नगच वाटत——"

एवढ्यात यशवताची बायको फेसासकट धारोष्ण दुधाचा ताब्या आणून पंतापुढे ठेवते. हसत हसत पदर तोंडाला लावीत विचारते,

" वयनीसाब हायिती का बऱ्या ? "

त्या गरम दुधात सबध बाळपण साठवलेले आहे असे पताना वाटते——

उठताना पत यशवताला म्हणतात,

" यशवता, एकदा घेऊन ये नगरला सगळ्याना. शिरडीला वगैरे जाऊन येऊ. "

" बगुया, बगुया ह. एक डाव याच हाय तुज्याकड. लईदी मनात हाय बग—"

आणि पंत निघतात. त्याची सायकल रस्त्याला लागल्यावर भरधाव सुटलेली असते. आणि मग एकदम त्याना आठवते की गेल्या वर्षीचे त्याच्या वाटेकऱ्याने त्याना काहीच दिलेले नसते, ते त्याला विचारायचे गडबडीत राहिलेच की ! !——

# अशाश्वत

सकाळचे आठ वाजून गेलेले असतात. उन्हें कितीतरी वर आलेली असतात. विसूआण्णा जागे होतात. त्याना अथरुणातच पडून राहावेसे वाटते. अग जड झालेलें असते. मन बधीर झालेले असते, आणि तसेच अग मोडून पडून राहावेसे वाटते. पण मग पडून राहण्याचाहि त्याना कटाळा येतो. म्हणून मग ते अथरुण सोडून दूर होतात. स्वयंपाकघरात जातात. त्याची बायको चुलीशी काहीतरी करीत असते. चुलीत धूर मावेनासा होऊन सबध स्वयपाकघरात कोदलेला असतो. विसूआण्णाना गुदमरल्यासारखे होते. त्या धुरातूनच विसूआण्णा न्हाणीजवळच्या कोनाड्यापुढे येतात. चिमूटभर राखुडी घेतात. उजव्या हाताच्या मधल्या बोटाने दात घासू लागतात. राखुडीत बरेच खडे असतात. त्यामुळे दात घासण्यात त्यांचे

मन लागत नाही. गावी असतांना ‘ राखुडी लावणे ’ हा एक त्याचा निवात उपक्रम असायचा. राखुडी कशी काळीशार आणि लोण्यासारखी मऊ असायची. विसूआण्णा हात झाडून भराभरा पाण्याच्या चुळा भरतात. धोतरालाच हात पुसत चुलीजवळच खाबाला टेकून बसतात. वेणूताई त्याच्यापुढे चहाचा कप ठेवतात. शेजारी घोटाळणारी नल्र त्याना सबध चहा पिऊ देत नाही. शेवटची बशी तिच्या तोडाला लावून ते हळूहळू सपणाऱ्या चहाकडेच पाहात राहतात.

चहा घेऊन झाल्यावर विसूआण्णा बराच वेळ स्वयपाकघरातच बसून राहतात. कुदा आईच्या हाताखाली काम करीत असते. तिच्याकडे विसू-आण्णा डोळे भरून पाहून घेतात. न्हाणीजवळ जाऊन उभ्याउभ्यानेच कुदा एक पातेले विसळते. पाण्याचे तुषार सगळीकडे उडतात. विसूआण्णा शहारल्यासारखे करतात. उठून बाहेर सोप्यात येतात. मदा समोर पुस्तक ठेवून वाचत बसलेली असते. विसूआण्णा खिडकीतून बाहेर पाहात राहतात. बराच वेळ पाहात राहतात. मग कटाळून तिथे अथरलेल्या सतरजीवर तक्क्याला टेकून आडवे होतात. बाहेरून आलेल्या दिनूने फरशीवर पाय आपटलेले असतात. विसूआण्णा केवढ्यादा दचकतात ! ते उठून बसतात. उगीचच पुन्हा स्वयपाकघरात जातात. भली मोठी घागर नळावरून भरून कुदा कडेवरून घेऊन येत असते. तिचा एका बाजूला झोक गेलेला असतो. विसूआण्णाना उगीचच ती घागर घेऊन पडेल असे वाटत राहते. पण तसे काही होत नाही. कडेवरून घागर अलगद उतरून ती पिपाजवळ ठेवते. विसूआण्णा निश्वास टाकतात. त्या थडपणानेच ते बाहेर येतात. खुटीवरची टोपी डोक्यावर ठेवतात. पायताणात पाय अर्धवटच सरकवतात. आणि बाहेर पडतात.

विसूआण्णा उगीचच भ्याल्यासारखे रस्त्याच्या कडेकडेने चालत असतात. रस्त्यावर माणसाची वरदळ असते. माणसाची गर्दी पाहिली की ते कावरे-बावरे होतात. त्याच्या गावात चौकाचौकात माणसे जमलेली असायची. खलबते चाललेली असायची. दारू पिऊन तर्रर्रऽऽ झालेले डोळे आग बाहेर टाकायचे—एकदा तर सद्या कदमाने दारूच्या नशेत कमरेचे धोतर फराफरा फेडून रस्त्यावर टाकले होते—विसूआण्णानी खाली मान

घातलेली असते. आपण अजून आपल्या गावातच आहोत असेच त्याना वाटत असते समोरच्या चौकातल्या पारावरचा पिपळ वाऱ्याने किती जोराने हालत असतो. तो उन्मळून पडेल की काय असे विसूआण्णाना वाटत राहते. त्या पिपळाखाली तीन-चार महारोगी बसलेले असतात. त्याच्याकडे पाहिल्याबरोबर विसूआण्णाच्या अगावर शहारे येतात. गावातल्या शेकडो महारोग्याचे चेहरे त्याच्या डोळ्यापुढे येतात. शेजारच्या देशपाड्याच्या घरातल्या रामभाऊची बोटे झडायला लागल्याचे समजताच आपण बेचैन झालो होतो याची त्याना आठवण येते. अचानक घरावर पोलिसानी घातलेला छापा, आपल्याच उकिरड्यातून तीन डब्याचा पोलिसानी काढलेला नरक, आपण घेतलेली भगवद्गीतेची शपथ—त्याना सगळे आठवते—पोलीस शपथ ऐकून फिदीफिदी हसले होते—पंढरपूरचा विठोबा पाठीशी होता म्हणून निसटलो. आपल्या घरापलीकडल्या यादवाच्या हरणाबाईला निवात उकरडा दुसरीकडे कुठे सापडलाच नाही—

उन्हाचा चटका बसल्यावर आपण फार दूर आलों हे विसूआण्णाना जाणवते. चालत चालत ते फारच दूर आलेले असतात. जाताना त्याना शेरभर साखऱ्या न्यायला हवा याची आठवण होते. समोरच्या किराणा-मालाच्या दुकानात विसूआण्णा जातात. दुकानांत माल ठेचून भरलेला असतो. समोर साखरेच्या पोत्याची थप्पी लागलेली असते. विसूआण्णा शेरभर साखऱ्या घेतात. बाहेर पडतात. दुकानातल्या साखरेच्या पोत्याची थप्पी अजूनहि त्याच्या डोळ्यापुढे तरळते. सोसायटीच्या ऑफिसातली साखरेची पोती— सल्फेटची पोती— नवसागराचा रग— सगळ्या वस्तु दिसायला सारख्याच. मग खायला काय हरकत आहे ?—विसूआण्णाना या नुसत्या कल्पनेनेच शिसारी येते. उगीचच ते रस्त्यावर दोन-चारदा थुकतात. समोरच्या स्टेशनरी दुकानात काऊटरवर एक मुलगी बसलेली असते— विसूआण्णाना तिचे उगीचच कौतुक वाटते—

विसूआण्णा घरात पाऊल टाकतात तेव्हा सोप्याला कुणीहि नसते. मंदा, दिनू शाळेत गेलेली असतात. नलू जेवून झोपलेली असते. विसूआण्णा स्वयपाकघरात जातात. वेणूताई त्याची वाट पाहात थाबलेल्या असतात—

कुंदा आजूबाजूला कुठच दिसत नाही. विसूआण्णा एकदम धास्तावतात. काळजीच्या स्वरात वेणुताईना विचारतात,

" कुंदी कुठ गेलीय ? "

" जेवल्या सगळ्याजणी मघाशी. गेली आहे मैत्रिणीकडे– "

" एकटीच ? "

" इश्य ऽ, हल्ली रोज नाही का जात ती शेजारच्या बोकिलाच्या विभावरीकडे विणायला ? "

—विसूआण्णाना केवढे समाधान वाटते– मग ते उठतात. न्हाणीकडे जाऊन भराभरा चुळा भरतात. ताब्यातले पाणी सपून जाते. पुन्हा ताब्या भरून घेऊन ते चुळा भरतात. अगदी ताब्यातले पाणी सपेपर्यंत– मग तसेच पानावर येऊन बसतात. बराच वेळ ते जेवत राहतात. केव्हातरी त्याना पोट भरल्यासारखे वाटते. म्हणून ते पानावरून उठतात. हात धुतात. चुळा भरतात. धोतराला हात पुसत पुसतच बाहेर येतात. अथरेलल्या सतरजीवर त्याना पडावेसे वाटते. थोडीशी सुस्ती आल्यासारखी वाटते. पण हल्ली त्याची झोपच उडालेली असते. हल्ली रात्रीसुद्धा त्याना लौकर झोप येत नाही. झोपेसाठी तळमळण्यातच त्याची अर्धी रात्र सपत असते. रोज दुपारी त्याना झोपेच्या कल्पनेतच वेळ काढावा लागतो. आढ्याकडे पाहात ते बराच वेळ पडून राहतात. थोड्या वेळाने त उठून खिडकीजवळ येतात. समोरच्या जागेत एक नवविवाहित जोडपे राहात असते. नवरा ऑफिसला गेलेला असतो. घरात दुसरे कोणीहि नसते. दार उघडे ठेवूनच ती मुलगी मजेत गाणे गुणगुणत असते, याचे विसूआण्णाना आश्चर्य वाटते. पण शेजारच्या कितीतरी बिऱ्हाडातून हीच अवस्था असते– मग विसूआण्णा आत येतात. कपाटावर मुलाची शाळेची पुस्तके पडलेली असतात. विसूआण्णा उगीचच कितीतरी वेळ ती चाळतात. त्याना मग कटाळा येतो– एवढ्यात खिडकीतून आत माजरीने धपकन् उडी टाकलेली असते. विसूआण्णा केवढ्यादा दचकतात– त्या माजरीच्या पाठीमागे एक बोका गुरगुरत लागलेला असतो. ती पुढे जीव घेऊन पळत असते. पलीकडल्या घराच्या कौलावर तो बोका त्या माजरीला गाठतो. ती जोराने फिस्कारते. पण तिचे काहीहि चालत नाही. विसूआण्णाच्या

आंतमध्ये काहींतरी कलकलते. त्या माजरीच्या ओरडण्यासारखेच माळयाच्या बकुळेचे ओरडणे होते. आडावर पाणी भरायला आलेली असताना बकुळेचा विलास पाटलाने धरलेला हात– फुटलेली काकणे– हिरा गुरविणीच्या पोरीचा दोन दिवस गावात पत्ताच नव्हता– हिराने केलेली रडारड– केलेला आकात– विसूआण्णाना वाटत बकुळेचा आवाज मावण्याइतकी आसमतात पोकळी आहे आणि नवऱ्याच्या जातीला रडता येत नाही– न रडण्याची सक्ति––

पातळाचा बोळा तोंडात कोंबून पाटलाच्या वाड्यात 'नाही नाही, नको नको' म्हणणारी मागाची धुरपा– सुख माणसाला मुग्ध करते. दुःखाला मात्र शब्दाचा अकुर येतो. पण अंकुरहि जाळून टाकलेला– पाटलाच्या शेतात भागलायला गेली हाच तिचा दोष. विसूआण्णाना माहिती असते की, हा तिचा खरा दोष नव्हे. तिचे बिलोरी आरशासारखे रूप– तिला माहीत नव्हते की कामाला येणाऱ्या बायकातली आवडलेली बाई विलास पाटील बोलावून घेतो. तिला शेजसोबत करावीच लागते– तिची इच्छा असो वा नसो– जगात अशी काही माणस जन्मतात की, त्याच्या इच्छेला काही किमतच नसते– पोट जाळण्यासाटी नवरा दूर मुबईला गिरणीत नोकरीला– नारायण माग सासरा झाला म्हणून काय झाले ?– अपार काबाडकष्ट. इतके की त्या कष्टातून सुखोपभोगाची आठवणच मरून गेलेली– पाटलाच्या वाड्यात तिन्हीसाज टळून गेल्यावर खोलीत कोंडलेली आरशासारखी धुरपी– कोंडलेल्या चिमणीसारखी––

स्वतःच्या मनाविरुद्ध अब्रूवर घाला आला असताना स्त्रीला होणारे दुःख हे जगातले सर्वात मोठे दुःख. धुरपीची तडफड– आकाडताडव–

जगात अशी काही माणसे असतात की त्याना, नकार ऐकणे सहन होत नाही. विलास पाटील त्यातला आहे. कातड्याच्या चाबकाने त्याने धुरपीला फोडून काढले. कापराच्या अगाला फोड आले. आभाळाचा टवका निघाला. रेशमाच्या घडीवर लाडगा बसलेला पाहून खुद्द देवानेच आवढा गिळला––

विसूआण्णाना सर्वात वाईट वाटलेले असते, नारायण माग दुसऱ्या दिवशी त्याना भेटायला आला होता तेव्हा. तो त्याच्याजवळ सल्ला मागायला,

दाद मागायला आला होता. दुर्दैव असे की, विसूआण्णा त्याला काहीच सागू शकत नव्हते. ते स्वतःच दबून गेले होते. दडपून गेले होते. आपण या बाबतीत काहीच करू शकत नाही, याचेच त्याना मनस्वी वाईट वाटत होते. गावातल्या सगळ्याचेच अस्तित्व सपले याची त्याच क्षणाला त्याना जाणीव झाली होती.

नारायण केवढा उचा–पुरा माणूस–गोरापान, नितळ, नाकेला. लाबसर झुपकेदार मिश्या–दोऱ्या वळायचा म्हणून माग म्हणायचे—त्याला पाहिल्या-वर याला उगीचच मागाच्यात जन्माला घातले गेले असे विसूआण्णाना वाटायचे–मागाच्यातला वशपरपरागत क्रूरपणा दारिद्याने पीठ करून टाकलेला. आयाळ आणि दात काढलेल्या सिहासारखा—देसायाच्या वाड्यात जाऊन नारायणने धरलेले धरणे—त्यानतर तो कुणाला दिसलाच नाही–आठव्या दिवशी देसायाच्या घरातून त्याचे प्रेतच बाहेर आले—सास-ऱ्याच्या काळजीने घेतलेला अब्रूचा धसका आठव्या दिवशी प्रेताच्या रूपाने बाहेर आला—आणि त्याने सगळ्या गावाला सागून टाकले–गावात कुणाची मुलगी वयात येता कामा नये आणि कुणाची तरणी सून घरात येता कामा नये–विसूआण्णाना चागले आठवते आहे की, त्यानतर गावात काहीहि घडले नाही. वादळ झाले नाही. पाऊस कोसळली नाही. वीज कडकडली नाही. नदीला पूर आला नाही. काऽऽही नाही–ऋतुचक्र निवात चालले आहे––

पण या साऱ्याच्या किकाळ्यानी विसूआण्णाची झोप उडवलेली आहे. माळ्याची बकुळा, हिरा गुरविणीची मुलगी, मागाची धुरपी–याच्या सगळ्याच्या किकाळ्या विसूआण्णाच्या कानात सतत घुमत आहेत–तेव्हा-पासून त्यानी धसकाच घेतलेला आहे. तेव्हापासून ते भेदरलेले, भ्यालेलेच राहतात. सौदर्य हे इथल्या जगात पाप होऊन राहिलेले. विसूआण्णाना कुदामदाच्या दृष्ट लागण्यासारख्या रूपाची उगीचच काळजी वाटत राहते. लग्नाच्या दोन मुली घेऊन इथे राहायचे या कल्पनेने सध्याकाळ झाली की, त्याचा जीव टागला जातो. भयाणता वाढू लागते. अस्थिरता वाटते. दिवसा त्याना विशेष काही वाटत नाही. पण रात्र त्याना भीति दाखवते. कुठे खुट् वाजले की ते दचकतात–बावरतात–या भीतीने, अस्थिरतेने त्याचे

सगळे जीवनच खाऊन टाकलेले असते. तिथे राहणेच त्याना धोक्याचे वाटते. ही त्याची चलबिचल वेणूताईच्या लक्षात आलेली असते. पण झाड पोखरले गेले तर वेलीने काय करायचे ? त्याचीहि अवस्था पाण्यातल्या पिळ्यासारखी झालेली––

म्हणूनच एक दिवस विसूआण्णानी गाड्या भरायला सुरुवात केलेली असते. पिढ्यान्पिढ्या चाललेला ससार दीड वितीच्या बैलगाडीत सावरणे चाललेले असते. काही राहिलं आहे का पाहण्याच्या निमित्ताने आपण मोकळ्या घरात पुन्हा एकदा गेलो हे विसूआण्णाना आठवते. त्या वेळी त्याच्या भावना डोळ्यात भरून आलेल्या असतात. घर केवढे पोरके दिसत होते–स्वतः सारखेच––त्याची आवराआवर पाहिल्यावर गावातल्या लोकानी त्याना विचारणा केलेली असते. पण मुलाच्या शिक्षणाच्या निमित्ताने आपण शहरात जातो आहोत असे सागून त्यानी लोकाना गप्प बसविले होते. गाड्या निघालेल्या असतात–विसूआण्णाच्या डोक्यात विचाराचे काहूर उठलेले असते. आपल्याला शिक्षण नाही, नोकरी मिळणार नाही, शहरात शेणालाहि पैसा द्यावा लागतो–आपल तिथ कस निभायच ? मनाला डाचत आहे–वाडवडिलाच घर सोडायच–चौसोपी वाडा, शिसवीसारख्या कडी-पाटाचा सोपा, प्रशस्त स्वयपाकघर, शेजारच देवघर–घरपण जपणार माजघर, तीन माड्या, बाळतिणीची खोली, स्वच्छ अगण, सोनचाफ्याच झाड–पारिजातकाचा सडा–सगळ सगळ सोडून जाव लागत आहे–गाडी केवढ्यादा हालते आहे–सगळच अस्थिर आहे अस वाटत राहत–याला स्थिरता कुणी आणील का ? मर्यादेच्या पलीकडे गेलेल हे वातावरण कुणी बदलेल का ? कुठ चाललो आहोत आपण ? कुठ चालला आहे हा प्रवाह ? का ? कशासाठी ?– तरीहि गुतलेल मन बाहेर निघत नाही. मोकळ्या वाड्याला आपण कुलूप लावले–सुरक्षिततेची केवढी भावना विसूआण्णाच्या मनाला चाटून गेली–कायदा, सुव्यवस्था, तुरुग–वास्तविक कुलपाचा शोध लागला त्याच वेळी माणूस कसा आहे हे सिद्ध झाले आहे––बाकीच सगळ फोल आहे––गाडीत भरलेली सगळी पोती फोल-कटाचीच आहेत. राजकारणाची, तत्त्वज्ञानाची फोलकट–– आणि एकात देवाच गाठोडं आहे.–– भजनी मंडपातला जुगार–

विसूआण्णा भराभरा स्वयपाकघरात जातात. खळाखळा चुळा भरतात. ताब्याभर पाणी डोक्यावर ओतून घेतात. पाण्याच्या आवाजाने मधल्या खोलीत कलडलेल्या वेणूताई जाग्या होतात. घाबऱ्या घाबऱ्या स्वयपाकघरात यतात. त्याना भान राहात नाही. डोके पुसण्यासाठी त्या पदराचाच शेवट पुढे करतात. विसूआण्णाना केवढी जवळीक वाटते! त्याना घेऊन ते मधल्या खोलीत येतात. नलू अजूनहि झोपलेली असते. विसूआण्णा तिचे पाघरूण सारखे करतात—

विसूआण्णा बाहेर येतात. वेणूताई स्वयपाकघरात जाऊन स्टोव्ह पेटवतात. एवढ्यात दारात कुदा येते. विणलेले जविन पिशवीत घेऊन येते— विसूआण्णाना उगीचच दिलासा वाटतो. पोरीबद्दल कौतुक वाटते. थोडा वेळ ते सोप्यात येरझाऱ्या घालतात. एवढ्यात वेणूताई आतून चहाचा कप आणून त्याच्यापुढे ठेवतात. नलू आता उठलेली असते. थोडासा बशीतला चहा विसूआण्णा नलूला पाजतात. नलूचे पोट त्याशिवाय भरत नाही याची त्याना जाणीव आहे.— मुल शाळेतून यायची वेळ झालेली असते. विसूआण्णा बाहेर पडतात—

विसूआण्णा राममदिरापर्यंत येतात. आत कुणाचेतरी कीर्तन चाललेले असते. कुठेतरी वेळ काढायचा म्हणून ते आत जातात. कीर्तनाला खूप गर्दी असते. वाट काढून विसूआण्णा एका कोपऱ्यात जागा मिळवतात. कीर्तन रगात आलेले असते. द्रौपदीची कथा बुवा खुलवून आणि घोळवून घोळवून सागत असतात. मयसभेचे चित्र बुवानी आपल्या वाणीने श्रोत्याच्यासमोर मूर्तिमत उभे केलेले असते. भक्तासाठी परमेश्वर धावून येतो हा मूळ सिद्धान्त बुवा पुनःपुन्हा सागत होते. विसूआण्णाच्या डोक्यात पुन्हा विचाराचे द्वद्व सुरू झालेले असते—जनाबाई, मीराबाई,द्रौपदी—बकुळा, हिरा गुरविणीची मुलगी, धुरपी—दौपदी, धुरपी—दौपदी—धुरपी—उकरड्यातले रसायन —सल्फेटची पोती—मडपातला जुगार—विसूआण्णा चिडतात. त्याना सताप येतो. ते देवाचाच राग करतात—देवावरच चिडतात—

विचाराच्या भरात विसूआण्णा ताडकन् उठून उभे राहतात. सगळीं माणसे त्याच्याकडे पाहतात. विसूआण्णाना काहींच सुचत नाही. ते तसेच बाहेर निघतात. तडक घराकडे यायला निघतात—

पायऱ्या चढून विसूआण्णा आत येतात. शेजारच्या घरात रेडिओ लागलेला असतो. विसूआण्णाना रेडिओचा आवाज उगीचच मोठा वाटतो. समोरच्या जागेतल्या बाईचा नवरा ऑफीसमधून आलेला असतो. दोघांच्या हसण्या-खिदळण्याचा आवाज विसूआण्णाच्या कानावर इतक्या मोठ्यादा येतो कीं, ते बिचकतातच—मग मुल येतात आणि तासा दोन तासाचा वेळ कसा जातो हे विसूअण्णाच्या लक्षातच येत नाहीं—

रात्रीची जेवणे झाल्यावर अथरुण टाकलीं जातात. विसूआण्णा सोप्याला सतरजीवर पडलेले असतात. मुले मोठ्यादा काहीतरी वाचीत असतात. विसूआण्णा तेच ऐकत राहतात. रोजचा अभ्यास सपवून मुल आत आई-जवळ झोपायला जातात. आणि मग विसूआण्णा सोप्याला एकटेच राहतात —मधल्या खोलीत कुंदा नि मंदा निवात झोपलेल्या असतात. मुलीच्या कोंडाळ्यात पडलेल्या वेणूताई, याची तब्येत पहिल्यासारखी केव्हा होईल, याचीच काळजी करीत राहतात......

□ □ □

# कंटाळा

सकाळी आठ वाजता उन्हाचा कवडसा सोप्यात येतो आणि पहाटेच थंडीन आकसलेल अंग उबवण्यासाठी आजी तिथ येऊन बसतात. सकाळच्या उन्हाचे कोवळे किरण रध्रारध्रात शिरतात. ती ऊब आजी साठवून ठेवतात. तेव्हा त्याना जरा बर वाटत. सकाळी मुल उठलेली असतात. त्याचा दंगा चालू झालेला असतो. एवढ्यात आजीची नातसून चहाचा कप आणून ठेवते. गरम गरम कप भरून चहा घेतल्यावर त्याना जरा हुशारी वाटते. त्या मानान त्याच चहाच भाड जरा मोठंच आहे. शेवटची बशी पीत असताना त्याना जरा कटाळाच येतो. पण मग चहा संपल्यावर त्याच पोटच भरत. तशाच काही वेळ त्या उन्हातच बसून राहतात. जोत्यावरून चोरपावलान उतरणारं ऊन त्याच्यापासून पळून जाण्याचा प्रयत्न करत. हातातल्या काठीनं त्याला

पुन्हा ओढून घ्याव, पाघरून घ्याव, असं त्याना वाटत राहतं. पण थोडी सुस्ती आलेली असते. थोडा जड झालेला हात त्याना तसे करू देत नाही.

थोड्या वेळान उठून काठी टेकीत टेकीत आजी माजघरात येतात. नेहमीच अथरलेल्या अथरुणावर बसून राहतात. मघाच्या चहाची गुळचट चव जिभेवर अजून रेगाळत असते. काहीतरी तिखट तिखट, झणझणीत खाव, अस त्याना वाटत. उठून, स्वयंपाकघरात जाऊन हातान घ्याव अस त्याना वाटत, पण तितके त्राण अगात नसत. मग त्या नातसुनेला बोलावतात. काहीतरी खायला मागतात. त्याची नातसून मग पोहे लावून देते. बराच वेळ आजी पोहे घोळवून घोळवून खातात. तोड खमग झालेल असत. त्यावर काल रात्री गरम करून ठेवलेल कोमट पाणी पितात. मग त्या अथरुणावर आडव्या होतात...

एवढ्यात पूजेचा भटजी येतो. पूजेचे मत्र तो मुद्दामच जोरात म्हणतो. त्याबरोबर आजीच्या साऱ्या श्रद्धा उफाळून येतात. भटजीना काहीतरी द्याव अस त्याना वाटत. त्याच चरणतीर्थ घ्याव आणि त्याना मूठ भरून दक्षणा द्यावी अस त्याना वाटत. पण त्याच्याजवळ काहीच नसत. अगदी आठ-बारा आणेसुद्धा नसतात. आपणाला मनासारखा काहीच दानधर्म करता येत नाही म्हणून त्या चिडतात. बराच वेळ स्वतःशीच पुटपुटतात. आपल कुणीच ऐकून घेत नाही म्हणून जास्तच चिडतात. पूजा सपवून भटजी जायला निघालेला असतो. त्याला त्या हळू आवाजात जवळ बोलावतात. जवळची चादीची तपकिरीची डबीच त्याला देऊन टाकतात. त्याना मग समाधान वाटत. बराच वेळ त्याच तद्रीत त्या राहतात.. ..

स्वयपाकघरासमोरच्या न्हाणीघरात पाण्याचा बब सणसणून तापलेला असतो. चरचरीत आघोळ करावी, अस आजीना वाटत. पण तिथं पोराची झुंबड चाललेली असते. कार्टी सगळ पाणी सपवतील आणि मग आपल्याला कोमट पाण्यान अग धुवाव लागेल म्हणून त्या रागावतात. पोराच्या रट्ट्याला धरून त्याना बाहेर ओढून काढाव अस आजीना वाटत, पण त्याना तस करता येत नाही. पातळाच्या निऱ्यासुद्धा त्याना आता दुसऱ्याकडून करून घ्याव्या लागतात. निऱ्या करून दिलेलं पातळ नेसायलाहि त्याना बराच वेळ लागतो, आणि मग मुल त्याची टिगल करतात. आघोळ

करून ओल्यानंच बाहेर पळालेल्या बाळूला मध्येंच थांबवावा आणि काठीनं झोडपून काढावा, असं त्याना वाटतं. पण कार्टं वाऱ्यासारखं पळतं. सापडतच नाही.. ...सगळ्याच झाल्यावर आंघोळीसाठीं आजी आत जातात. सुरकुतलेल्या हातापायावरून, विशविशीत झालेल्या अंगावरून गरम गरम पाणी घेताना त्याना बरं वाटतं. पण न्हाणीघरातून बाहेर आल्यावर त्याना थंडी वाजते. मग त्या बाहेरच्या चौकातल्या उन्हात येऊन बसतात. बराच वेळ बसतात

गोविंदराव माडीवरून खाली येतात. साडे दहा वाजता खाली येऊन आंघोळ–जेवणाची ते गडबड करतात. अकरा वाजता त्याना ऑफिसला जायचं असतं. ते आजीना सांगतात, " आज्जी, फार वेळ उन्हात बसूं नको. त्यामुळं ब्लडप्रेशर जास्त होतं " कुरकुर करीत आजी पुन्हा माजघरात येतात. साडेदहाला सगळ्यांची पानं वाढलीं जातात आजींनाहि भूक लागलेली असते. त्याना हल्ली फार भूक लागते. म्हणून त्या गडबड करतात. त्या जेवायला बसतात. आजीच्यासाठी मोठा वाडगा भरून ताक–दूध दिलेलं असतं. पण आजीना ते आवडत नाहीं. हे कसलं दूध ? विकतचं ! फळफळीत ! घरात पूर्वीं दोन दोन म्हशी असायच्या. फेसासकट दुधाचा तांब्या आपण मुलाच्यामध्ये ठेवीत असू. सायीसकट दही भातावर. लोण्याचे गोळे भाकरीवर. कपाटात कणीदार, पिवळसर तांबूस तुपाच्या गुंड्या भरलेल्या असायच्या. हे सगळं आठवून आजीच्या कपाळावर आठ्या पडतात. त्याना मग काहीच गोड लागत नाहीं. त्या कसेंबसे जेवण उरकतात......

साडे अकरा वाजता किलबिलणारं ते सारं जग शांत होतं. आजीना गुंगी येते. बारीक सुस्ती अंगभर फिरते. पापण्या जड होतात. आजी मग त्या गुंगीतच तासभर स्वस्थ शांत पडतात......सुमारे एक वाजता त्या जाग्या होतात. सगळं कसं शांत असतं. दहा पांच मिनिट आजी तशाच पडून राहतात. मग अंथरुणावर उठून बसतात. तपकिरीची डबी इकडे तिकडे शोधतात. चांदीची डबी भटाला दिल्यापासून त्याना स्टेनलेसचा एक डबाच तपकिरीसाठीं दिलेला असतो. एवढा मोठा असूनहि तो त्याना दिसत नाहीं. सापडत नाहीं. नातसून काम आवरून माडीवर झोपलेली

असते. मुलं शाळेला गेलेलीं असतात आणि तपकिरीचा डबा शोधून द्यायला कुणीच नसत. मग त्या त्रासतात. चिडतात. सहज इकडे तिकडे हात फिरवताना उशालगतच ठेवलेला डबा त्याच्या हाताला लागतो. त्याना आनंद होतो. त्या स्वत:शीच थोड्याशा हसतात. झाकण काढून चिमूट घ्यायला जातात, पण तपकीर चिमटीत येतच नाहीं. पार सपलेली असते. मग मात्र त्या चिडतात. जास्तच चिडतात. आताशा त्याना तपकीर ओढण्याची फार उबळ आलेली असते. नाक गुळूगुळू करत असते. गच्च झालेले असतें. बक्कळ तपकीर भरून सरसरून ओढल्याशिवाय बर वाटणार नाहीं याची त्याना खात्री असते. आण्याची तपकीर मला लागते तर ती याना जड होते !

आजीना मग चुटपूट लागून राहते. एवढ आपल वैभव. सासरच आणि माहेरच. वीस वीस हजार आब्याची आढी पडायची माडीवर ! सगळ घर वासान घुमायच. पालखीमेणा होता घरचा ! किती कौतुक व्हायच माझ त्या वेळी. हे तर मला कुठ ठेवू अन् कुठे नको अस करायचे. आजीना आपल्या यजमानाचा आठव येतो. गोरीपान शरीरयष्टि, गोरी गोरी छाती, पाट्यासारखी पाठ, काळेभोर डोळे, अणकुचीदार शेंडा असलेल नाक. इतकी माझ्यावर मर्जी असून माझ्याआधी गेले ! यजमानाच्या आठवणीन आजीचे डोळे ओले होतात. तिथच ओल्या आठवणीहि जमा होतात. आपल्याला दोन्ही मुलीच झाल्या. एकीचा तरणा ससारच विस्कटला. माझ्या-सारखच लेकीच कपाळ पाढर फटफटीत झाल, म्हणून तिला भेटायला आले. कोपऱ्यात बसून ती रडायची. मी तिला समजवायची. मग मी रडायची. ती मला समजवायची. यातच वर्षहि गेल आणि रडणारी लेकहि गेली. ही सगळीं मुल, गोविदा, अगदी लहान लहान होती. चिमणीएवढी. केवढा धीर केला आपण. गाई–म्हशींच्या धारा काढून पोराना दुधं पाजली. दु:खाची कुऱ्हाड पाठीवर घेतली. आणि पोटाजवळ, कुशीत ही पोरं वाढवलीं. गोविदा किती अशक्त असायचा. त्याला पाठीवर घेऊन कोल्हा-पूरच्या डाबरी रस्त्यावरून, पायताणाशिवाय, उन्हाचे चटके घेत, डॉक्टराच्या कडे हेलपाटे घातले. त्याला मोठा केला. शिकवला. शाळेतून यायला गोविंदान जरा वेळ केला तर पायताण घालून चटाचटा इस्लामपुरापर्यंत

त्याला आडव जायच. त्याला उशीर झाला की छातीत अस हलायचं. खूप खूप केल त्याचं. पण आता तपकिरीसाठी मी परस्वाधीन. का असं? नातसून माडीवर झोपलेलीच असते. तिला बोलावून तपकिरीला दोन आणे मागून घ्यावेत, असे त्याना वाटत राहते. पण तिच्याजवळ पैसे नसतात हे आजीना ठाऊक असते. मग त्याना सगळ्याचा राग येतो. नातसुनेचा, मुलाचा, गोविंदाचा...

इतक रागावूनहि तपकीर मिळत नाही म्हणून त्या चिडतात. सगळ अवसान आणून काठी घेऊन आजी शेगाच्या हौदाजवळ येतात. बचक बचक भरून शेगा एका पातेल्यात घेतात. ते घेऊन लटपटत, आजी दारातल्या भाव्याच्या बिऱ्हाडात जातात. शेगा तिथ ठेवतात. दोन आणे मागतात. भाव्याची बायको शेगा घेत नाही आणि पैसेहि देत नाही. आजी हळूच उठून पुढच्या घरात जातात. तिथ जाईपर्यंत आजींना झेडू फुटतो. जोश्याची बायको शेगा घेत नाही, पण दोन आणे देते. त्याच्याच मुलाकडून आजी तपकीर आणवतात. त्याना समाधान वाटत राहत. सूड घेतल्याचा आनद त्याना वाटत राहतो. एवढ्यात त्याची नातसून घाबऱ्या घाबऱ्या शोधत तिथ येते. अथरुणावर बसून आजी बराच वेळ उसासे टाकतात. त्याना घाम आलेला असतो. जीव घाबरा झालेला असतो. त्याची नातसून हळू आवाजात त्याना बाहेर जाण्यान ब्लड प्रेशर वाढेल, अस सागते . ..

साडे पाच वाजतात आणि मुल शाळेतून येतात. खाऊसाठी दगा करतात. भाडण करतात. इतक्यात गोविंदराव येतात. कोट टोपी काढून ठेवतात. हातपाय धुतात. चहा घेताना आजीची सगळी हकिकत त्याना समजते. गोविंदरावाचा पारा एकदम चढतो. ते आजीना बोलतात. तोडून बोलतात. इतक सोसूनहि अशा बोलण्यान आजी रागावतात. भाडतात. गोविंदराव मग निक्षून विचारतात, "तुला हज्जारदा सागितल न, अस बाहेर जात जाऊ नकोस म्हणून? दिसायला फार वाईट दिसत ते. आणि सगळ्याच गोष्टी दिसण्यासाठीच करायच्या असतात अस नाही. मनालाच सहन होत नाही हे."

"मग तुम्ही सगळे मला काही देतच नाही तर काय करू? मी जाणार—" अवसान आणून आजी सांगतात.

" पण तुला मीं कुठली गोष्ट नाहीं म्हटली आहे का ? तू काहीहि माग, तुला वाटेल ते आणून देतो. "

" राडल्याका, काय आणून देतोस तू मला ? तोंड बघ तुझ. शंभर रुपये पाहिजेत मला. औदुंबरच्या दत्ताला खर्च करायचे आहेत मला. "

" जगातल वैभव तुझ्या पायावर ओततो अस नाही मी म्हणत. पण मला तरी, आज्जी, थोडा खर्च आहे का ? महिन्याला पचवीसतीस रुपये तुझ्या औषधाचे होतात. "

" काही उपकार करत नाहीस. माझ मला उत्पन्न आहे. आणि मस्त केल आहे मीं तुमच्यासाठी. "

" आम्ही कुठं नाही म्हणतोय आज्जी. आणि तुझ उत्पन्नच कशाला पाहिजे ? माझ मला काही नाही आहे का ? त्यातून तुला काय पाहिजे ते देईन. फक्त तू मला मागत जा आणि तुला पैसे काय करायचे आहेत ? तपकीरच पाहिजे असते ना ? पण जास्त तपकीर ओढू नका म्हणून डॉक्टरनीच सांगितलं आहे. "

" चुलीत घाल तुझ्या त्या डॉक्टरला त्याला काय कळतय् ? ब्लड प्रेशरचा आणि तपकिरीचा काय सबध ? मला नाही चैन पडत त्याशिवाय— आणि मला पैसे तरी काय करायचे ? तपकीर आणून देत जा. चुरमुरे आणून देत जा. मला पोहे आवडतात. तोंड कडवट होत नेहमी. खडी-साखरहि लागते जरा. "

" एवढच न ? हा घे एक रुपया. मग तर झाल ना ? " अस म्हणून रुपया आजीच्या हातावर देऊन गोविंदराव माडीवर जातात. एकदर प्रकारामुळ गोविंदरावाना वाईट वाटत. खुर्चीत ते एकटेच बराच वेळ बसून राहतात. आजींनीं आपल्यासाठीं फार केल आहे, फार कष्ट घेतले आहेत. याची त्याना जाणीव असते. तिला आता जास्तीत जास्त सुखात ठेवायच ही त्याची कल्पना असते. पण आजी आपल्याला समजून घेत नाही म्हणून त्याना वाईट वाटत. आपल परक, आजीला वाटत म्हणजे यात आपलाच पराभव आहे, अस त्याना वाटत राहत. त्याना मनस्वीं दुःख होतं. ते मग मुळूमुळू रडू लागतात......

बायकोन बोलावल्यावर गोविंदराव खाली येतात. सगळ्याच्या बरोबर कादापोहे खातात. आजीची नातसून आजींनाहि दहीपोहे देते. आजी बोलून-चालून थकलेल्या असतात. खाण झाल्यावर त्या घटाघटा पाणी पितात. त्याना मग बर वाटत. अंथरुणावर त्या आडव्या होतात. मुल बाहेर खेळायला जातात. गोविंदरावहि फिरायला जातात. आजीना दमल्यासारख, पिळून टाकल्यासारख वाटत. बाहेर उन्ह पार निघून गेलेली असतात. मग त्याना पेंग येतो. डुलकी लागते. चक्क कातरवेळेला आजी झोपलेल्या असतात.

साडे आठ वाजता मुलाचा दंगा पुन्हा चाललेला असतो. त्यात आजी जाग्या होतात. त्याचा गोविंदाहि फिरून आलेला असतो. त्या बाळूला हळूच बोलावतात. चागली आठ आण्याची खडीसाखर आणायला सागतात. रुपया घट्ट हातात धरून बाळू सुसाट पळत जातो. बाळू नाहीतरी फारच पळतो. घरातले उंबरे, जिना, पायऱ्या, जोते, सगळे त्याला सारखे भीत असतात. आजीनाहि सारखी भीति वाटत असते...बाळू गेला तसाच वाऱ्यासारखा परत येतो. खडीसाखरेची आख्खी पुडी आजीच्या हातात देतो. आपल काम कधीहि नाही न म्हणणाऱ्या बाळूची आजीना माया येते. त्याला एक खडीसाखरेचा खडा देतात. तसा यालाच दत्तकहि घ्यावा, अस त्याना वाटत. आणि बराच वेळ तसच वाटत राहत—

जेवण होतात आणि शिरीष आजीना औषधं देतो. रक्तदाबावरच्या त्या सणसणीत गोळ्या घेताना आजींना नको वाटत. त्या तोंड वाईट करतात. सकाळी एकदा त्या घशाखाली घालायच्या आणि संध्याकाळी एकदा. तीन वर्षं चाललेल्या या क्रमाला आजी कंटाळलेल्या असतात. पूर्ण कंटाळलेल्या असतात. कित्येकदा मग आजी गोळ्या घेतल्यासारख करतात आणि कुणी नाही अस पाहून कोपऱ्यातल्या अंधारात फेकून देतात. केर काढताना पुन्हा सापडल्या म्हणजे सगळ्याची बोलणी ऐकून घेत आजी गप्प पडून राहतात.

संध्याकाळचं वातावरण आता बदललं आहे. जेवणं करून मुलं पुस्तकं पुढं ठेवून अभ्यासाला बसलेली असतात. टिवल्याबावल्या करीत असतात.

चिमटे काढत असतात. झोप काढून जेवल्यामुळ आजीनाहि उत्साह आलेला असतो. गोविंदरावहि मघाची उदासीनता विसरून गेलेले असतात. त्याची बायको लाडिकपण त्याच्या हातावर सुपारीची चिमूट ठेवते. गोविंदराव खुषीत येतात. गाण गुणगुणत माडीवर जायला निघतात. जाता जाता आजीच्या जवळ थाबतात. खडीसाखरेचा लठ्ठ डबा पुढ्यात घेऊन आजी बसलेल्या असतात. गोविंदराव मुलासारखा हात पुढ करून आजीना खडीसाखर मागतात. आजीना काय लहर येते कुणास ठाऊक. त्या एकदम सागतात, ‘ काही मिळायची नाही ’ आणि डबा दडवून टेवतात. हसत हसत गोविंदराव माडीवर जातात.

काही वेळान आजीना काय वाटत कुणास ठाऊक. त्या काठी घेतात. दुसऱ्या हातात खडीसाखरेचा डबा घेऊन पाय लटपटत, धडपडत, जोराने श्वास घेऊन, जिना चढून माडीवर येतात. डोळ्यात पाणी आणून गहिवरून, गोविंदरावाला सागतात, “ बाळा गोविंदा, ही खडीसाखर घे. मघाशी मी नाही म्हणाले. माझ्या मनाला लागल. घे बाबा. ” गोविंदरावानाहि भरून येत. जिना चढायचा नसतो अस सागून ते आजीना हाताला धरून सावकाश खाली पोहोचवतात. आजीच्या आथरुणावर काही वेळ बसतात. त्याचे पिसपिशीत पाय चेपतात. फक्त कातडीच हातात येते...

थोड्याच वेळात सगळीकडे सामसूम होते. दिवसभर दमलेले सगळे जीव झोपेच्या आधीन होतात. आजी मात्र जाग्या असतात रामनाम म्हणण्यात त्या बराच वेळ घालवतात. पण लौकरच त्याचा त्याना कंटाळा येतो. मग आजी उठून उगीचच इकडे तिकडे करतात. पुन्हा अथरूणावर बसतात. बाहेरचे सगळे दिवे मालविलेले असतात. त्यामुळ अंधार गुडुप असतो. अंधाराची आजीना भीति वाटते म्हणून माजघरातला लहानसा दिवा तसाच असतो. पण तो जास्तच भकास वाटतो. ताबूस ताबूस. पिवळट. दिवसाचे आजीना काही वाटत नाही. पण रात्र मात्र सरता सरत नाही. लाबच लाब. झोपेसाठी त्या तळमळतात. कावऱ्याबावऱ्या होतात. पण त्याना झोप येत नाही. त्या उठतात. दिवा घेऊन घड्याळात पाहतात. फक्त साडेअकरा वाजलेले असतात. हरे राम ! म्हणजे अजून

पांच-सहा तास रात्र आहे! आजीना रात्रीची भीति वाटते. ती लपविण्यासाठी आजी स्वतःशीच बोलत राहतात. मोठमोठ्याने बोलत राहतात. त्याच्या आवाजाने सोप्यात झोपलेली मुलं चाळवली जातात. पण आजीचे तिकडे लक्ष नसते. आपल्या सगळ्या आयुष्याची आजी आठवण करतात. तस पाहिल तर आपल्या आयुष्याची परवड बरीच झाली, अस त्याना वाटत. अगदी सुरुवातीला सुखहि मिळाल. पण पुढ दुःखाची माळच. भरलेल घर दिराच्या भाडणासाठी सोडाव लागल. याचा स्वभाव फार सोशीक. फार समजस. फार गरीब. सगळं सोडून मुलीना घेऊन औदुबरला गेलो. दत्ताची सेवा केली. घाटावरून पाणी आणल. माधुकरी मागितली. पुन्हा घरी गेलो. पण हे गेले.. ...पुन्हा जावई गेला. मुलगी गेली, दुसरा जावई गेला, एक नात गेली. पुन्हा पुन्हा रडहि येईना. डोळ्यातल पाणीच आटून गेल आपल.. नातू मोठा झाला. हुशार झाला. आता सुखाचे दिवस आले अस वाटल. पण हे दुखण येऊन बसल. तीन वर्षे झाली, हे अथरूण आहे. अगदी आहे तस्स आहे. रोज झाडून पुन्हा घातल जात. कटाळा आला. त्या गोळ्या. ते कोमट पाणी. त्या बाटल्या, ते अथरूण, सगळ सगळ नक्को वाटत. सगळ्या सगळ्याचा कटाळा आला आहे. आयुष्याचाच कटाळा आला आहे.. ..

पुन्हा आजी अथरुणावर स्तब्ध पडतात. झोपण्याचा प्रयत्न करतात. पण काही उपयोग होत नाही. डोळे चुरचुरू लागतात. बोलून, विचार करून, त्याना थकवा आलेला असतो. आपली सगळी माणस यावीत, आपल्याला भेटावीत, अस आजीना वाटतं. लाब असलेली मुलगी यावी, भाऊ-भावजया, नाती, त्यांची मुल. सगळ्यानी माझ्याभोवती कोडाळ करून बसाव. मी त्याना जुन्या गोष्टी सागाव्या, त्यानी त्या मन लावून ऐकाव्यात .. पण...कोणी येत नाही. त्यानाहि माझा कटाळा आला आहे ..आजी मग चरफडतात, रागवतात स्वतःशीच. मग त्याना भूक लागल्यासारखी वाटते. स्वयपाकघरात जाऊन, काही तिखट तिखट, चरचरीत, खमग खावस त्याना वाटत. काद्याचंहि काही खाऊन पाहावं अशी विचित्र इच्छा त्याच्या मनात चमकून जाते. पण त्याना जागच उठवत नाही...आणि मग कशातच त्याचे मन लागत नाही.

ताणलेली, न संपणारी ही रात्र आजीना सहन होत नाही. केवढी रात्र ही ! लाबच लाब. रामेश्वराला बघितलेल्या समुद्रासारखी. तिचा त्याना मनस्वी कटाळा येतो. रात्रीचा, दुःखण्याचा, औषधाचा, आयुष्याचा आणि विचार करण्याचाहि कटाळा येतो. सगळ्या सगळ्याचा हा कंटाळाहि अति होतो. मग आजी अथरुणावर बसून रडतात. रडत रडत परमेश्वराला हात जोडतात. त्याच्याजवळ मरण मागतात...पुनः पुन्हा मरण मागतात... आणि मग...अशीच...सुमारे पाच वाजता आजीना झोप लागते—

□ □ □

# अन्न, पाऊस आणि जांभई

आण्णाशास्त्री भल्या पहाटे जागे होतात अथरुणा-वर उठून बसतात. बाहेर बदाबदा पाऊस पडत असतो. भितीना लोणा आलेला असतो. त्याची ओल अथरुणा-पर्यंत झिरपलेली असते. दार उघडून किती वाजले याचा अदाज घ्यावा असे आण्णाशास्त्रींना वाटत असते. पण पावसाची चिकचिक त्याना जागचे उठवीत नाही. आण्णाशास्त्री मग एक लाबलचक जाभई देतात. त्या जाभईच्या विकट आवाजाने निर्मलाबाई दचकून जाग्या होतात. आपले यजमान आज आपल्या आधीं उठून बसले आहेत हे पाहून त्या उशाचा पातळाचा बोळा घाईघाईने गोळा करून घेतात. लगबगीने अंथरूण गोळा करतात. आण्णाशास्त्री काहीच हालचाल न करता आढ्याकडे पाहात राहिलेले असतात. डाव्या हाताने छातीवरचे केस चिवडीत राहतात. बायको आपल्या

आधी उठली नाहीं म्हणून ते आज रागवत नाहींत. आज देशपांड्यांकडलें जेवणाचे निमंत्रण तिच्यामुळेच मिळाले आहे याचे मिधेपण त्याच्या एकटक उघड्या असलेल्या डोळ्यात अधारातहि अस्पष्टपणे का होईना दिसतें आहे. आण्णाशास्त्री मग एक भरकन् जाभई देतात. ती देऊन झाल्यावर कपाळाला आठ्या घालीत उजव्या हाताची तर्जनी कानात घालून गदागदा हालवतात. त्याच बोटाचा ते वास घेतल्यासारखे करून चेहरा वाईट्ट करतात, आणि मग पुन्हा एक जाभई देतात. तोंड जास्तीत जास्त लाब.—

"उठा—तोंड ध्वा—"या निर्मलाबाईच्या हाकेने आण्णाशास्त्रींचे तोंड मिटते. आण्णाशास्त्री उठता उठता आणखी एक लहानशी जाभई देतात. बाहेरच्या दाराकडे येतात. मग त्याना आठवते कीं, न्हाणीघर आतल्या बाजूला आहे. फताफता चुळा थुकून आण्णाशास्त्री परत सोप्यात येतात. हात न पुसताच, अथरुणाशेजारींच निर्मलाबाईंनीं ठेवलेला चहाचा कप घेतात, तोंडाला लावतात, आणि सगळा गरम गरम चहा एका दमात पिऊन टाकतात—

"इश्य, भाजत नाही का तोंड ? चहा बशीन प्यावा— "

"फार शहाणी आहेस, गारठ्याच्या वेळीं गारढोण चहा करतेस, तुला काही लाज आहे का ?"

निर्मलाबाईना वाईट वाटते. त्या गभीर होतात. एवढ्यात कडेला झोपलेला राजा झोपेत जोराने चावळतो. क्लोजिंगला पजा, क्लोजिंगला पजा असे ओरडतो. निर्मलाबाई जास्तच गंभीर होतात. जोगळेकर मास्तरनी भर चौकात पानपट्टीच्या दुकानात राजाला जुगार खेळताना पकडून बदडल्याचा प्रसग त्याना आठवतो. आणि याच वेळीं ताजा चहा घेऊन तरतरीत झालेले आण्णाशास्त्री खुशाल एक जाभई देतात. देशपांड्यांच्या घरी आज राजाला बोलावल असत तर बर झाल असत अस त्याना वाटत राहत. पण सगळ्याना हल्ली म्हणणारे ब्राह्मण लागतात. म्हणणाऱ्याना लेकाना नाहीं तरी अगदी चारी वेद मुखोद्गतच आहेत की नाहीत ? आणि ब्राह्मण काय म्हणत असतात हे तरी कुणाला कळतय ? उद्यापनाच्या वेळी सत्य-नारायणाची पोथी वाचली तरी कुणाला कळायची नाही. साधुवाण्याला बसला तसला हिसका बसला पाहिजे एकेकाला—

या सात्त्विक रागात आण्णाशास्त्री निर्मलाबाईवर रागवायचेच विसरून जातात. आज त्याना निर्मलाबाईचे उपकार वाटत असतात. निर्मलाबाईच्या-मुळेच आज त्याना देशपाड्याकडचे आमंत्रण मिळालेले असतें. देश-पाड्याच्या म्हातारीचा आज चौदावा असतो. चौदाव्याला हल्ली ब्राह्मण जेवायलाच जात नाहीत. कोर्टात नोकऱ्या करताना मळ्याच्या टाळूवरच लोणी खायला कमी करत नाहीत लेकाचे—चौदाव्याच अन्न काही कडू लागत नाही—देशपाड्याचा नातू काल निर्मलाबाईना स्वयपाकाला येण्या-बद्दल विचारायला आलेला असतो. त्या वेळी ' ह्याना ' जेवायला बोलाव-ण्याच्या अटीवरच त्यानी स्वयपाकाला यायचे कबूल केलेले असते. राजालाहि बोलावण्याचे निर्मलाबाईनी सुचविलेले असते, पण ते काही जमलेले नसते—तळलेल्या वड्याचा खरपूस वास नाकात घुसल्यासारखे आण्णाशास्त्रींना वाटत राहते. पिवळ्याधमक वरणात लोणकढ्या तुपाबरोबर कालवलेल्या भाताच्या घासाबरोबर वड्याच्या कडा ढकलल्या म्हणजे जिभेला काय छान चव येते. घास सपत आला की, आमसुलाच्या तिखटाचं बोट जिभेला पुसल की सगळ तोड कस खमग होत—बाप्याशास्त्री लेकाचा आपल्या भात खाण्याची टिंगल करायचा. त्याला लेकाला कुठ कमी लागतो भात—मापट्याच तपेल लागत एका वेळेला—कोर्टाच्या ओसरीवर बसण्यात जन्म गेला लेकाच्याचा. त्याला वाटत आपण मुनसफच झालो आहोत—तुझ्या सुध्याला तगीला करून घे अस आपण म्हणालो तर कसा कुत्सितपणाने हसला—हरामखोर—रागाच्या भरातहि मग आण्णाशास्त्रीना एक जाभई येते—

" आण्णा उठा—आथरुण काढते—

तुरुतुरु आलेल्या तगीने आण्णाना सागितल्यावर आण्णाशास्त्री उठतात. बाजूला होतात. कोपऱ्यात तोड करून उभे राहतात—

" सतरजीवर बसा—"

अस तगीन सागितल्यावर बसतात. तगी आली तशी तुरुतुरु आत निघून जाते. दोन्हीहि पोरी अर्धवट आहेत अस म्हणणाऱ्याना कान धरून वाकवाव अस आण्णाशास्त्रींना वाटत राहतं. ओढून ओढून त्याचे कान लाब होतील,

आणि त्या पसरलेल्या कानावर डोळे चिकटवावेत अशी एक विचित्र कल्पना आण्णाशास्त्रींच्या मनात डोकावून जाते—

निर्मलाबाई अग धुऊन दाडीवरचे पातळ घेण्यासाठी ओल्यानेच बाहेर येतात. कोपऱ्यातली काटी घेऊन दाडीवरच्या लुगड्याची घडी उचकटतात. पातळ काठीवरून डोके धरून खाली येते. आपण सध्या त्या वस्त्रासारखे आहोत अस आण्णाशास्त्रीना वाटत राहत. त्या अवस्थेतहि त्याना निर्मलाबाईबद्दल माया वाटते. आपली बायको आपल्यासाठी फार करते, स्वाभिमानान दिवस काढते अस त्याना मग बराच वेळ वाटत राहत. अधनमधन ती स्वयपाकाला जाते, पण तस म्हणायची कुणाची टापच नाही. काल देशपाड्याचा नातू आला होता तर स्वयपाकाला याल का म्हणायची त्याची छाती झाली नाही. आईन मदतीला याल का अस विचारल आहे असं म्हणाला—मुलगा किती समजस आहे. गगी-तगीसाठी त्याच्या वडलाना विचाराव असा एक विचार आण्णाशास्त्रीच्या मनाला स्पर्शून जातो—

बाहेर पावसाची रिपरिप चालूच असते. आण्णाशास्त्री दारातून पावसाकडे पाहून कपाळाला आठ्या घालतात. या पधरवड्यात नाहीतरी पावसाने थोडीहि उसत दिलेली नसते. आण्णाशास्त्रीना पावसाचा राग येतो. पण देशपाड्याची म्हातारी भर पावसाळ्यात जाऊनहि बरोब्बर तिला न्यायच्या वेळी पावसाने उघडीप दिलेली असते. पावसाने काहीहि त्रास दिलेला नसतो म्हणे. आण्णाशास्त्रीना बाहेरच्या त्या चेगट पावसाचीहि मग माया येते. देशपाड्याच्या म्हातारीच्या मरणामुळेच आज आपल्याला जेवायला जायला मिळणार आहे या कल्पनेने ते सुखावतात. मृत्यूबद्दलच मग त्याना काही काळ सहानुभूति वाटत राहते. निर्मलाबाईविषयीच्या सहानुभूतीपासून या सहानुभूतीपर्यंत आण्णाशास्त्रीचे मन फिरून येते. हिचा हात स्वयंपाकाच्या बाबतीत अगदी सुगरणीचा. आणि देशपाड्याकडे सामानसुमान द्यायला हात कधी आखडता असत नाही. भाजीबिजी कशी चमचमीत होते. आमटी तर सगळ्या स्वयपाकात गधर्व. प्यावीशी वाटते. हिच्या हातची आमटी प्याले की, टॉयफॉइडचा ताप पळून जाईल. देसायाकडे आपण आमटी प्यालो तर बाप्याशास्त्री लेकाचा गावभर शख करीत सुटला, ' आण्णाशास्त्र्याचे डोके बिघडले आहे, सात-आठ वाट्या आमटीच प्याला म्हणून. ' हरामखोर

लेकाचा—आणि मग बापूशास्त्रींच्या रागाच्या भरात आण्णाशास्त्री छातीवरचे केस चिवडीत राहतात—

देशपाड्याची मुलगी निर्मलाबाईना बोलवायला छत्री घेऊन येते. तिला पाहून राजा खिडकीजवळ येतो. आणि गाल फुगवून, सबध डोके हालवून शीळ घालतो. राजाच्या त्या फुगलेल्या गालाचा दातानी लचका तोडावा अस आण्णाशास्त्रीना वाटत राहत. ते त्याच्या अगावर धावतात. राजा आत आईच्या आसऱ्याला पळून जातो. आण्णाशास्त्री मग जास्तच चिडतात. नाहीतरी राजा हिच्या लाडानच शेफारला आहे अस त्याना वाटत राहत. बिड्या ओढत कार्ट. आपण एकदा बाहेरून आलो तर ही स्वयपाक करत होती. आणि कार्ट चुलीत बिडी पेटवीत होत—

देशपाड्याची मुलगी आण्णाशास्त्रीकडे न पाहता, अग चोरून, सरळ आत जाते. आईन लौकर बोलावल्याच सागते. राजा तिथच रेगाळत असल्यामुळे ती निरोप सागून तिथून लगेच निघते. ती अशी पावसातून आल्यामुळे आण्णाशास्त्रीना तिच्याबद्दल माया येते. पण मग आपल्या बायकोने नाहीतरी फारच वेळ लावला अस त्याना वाटत राहत. म्हणून ते स्वयपाकघरात जाऊन निर्मलाबाईवर खेकसतात—

"आमत्रणाची वाट बघत बसली होतीस काय?"

"निघालेयच. स्वयपाकाच सागत होते गगीला. राजा, त्या जेवणारायतच न?"

"तर तर, वाढून आणल्याशिवाय राहणारायस काय तू?"

"तेवढ नाहीतर पुरणाराय काय? आणि आपली काय सत्ता आहे काय त्याच्यावर?"

"बर बर, बडबडत वेळ घालवू नकोस आता. खोळबल्या असतील सगळ्या–"

धुऊन कडकडीत झालेल पातळ नेसलेल्या निर्मलाबाई मुलीना भराभरा पसारा आवरायला सागतात. आणि सोवळ्यान देशपाड्याकडे जायला निघतात. पावसाची झिमझिम अगावर घेत, पावले जपीत, अग चोरून त्या चालू लागतात—

आण्णाशास्त्री मग एक लांबलचक जांभई देतात. स्वयंपाकघरात येतात. चुलीवर काहीतरी शिजत असतं. त्याचा कढ भांड्याच्या काठावर चिकटलेला असतो. तो पिवळसर कढ पाहून आण्णाशास्त्रींना वरणाची आठवण होते. हल्ली तुरीची डाळ काय महाग झाली आहे. स्वस्ताईत तीन आणे, दहा पैशाला शेर होती. आयुष्य सगळं परान्न घेण्यात गेलं. वरणाशिवाय जेवणच जायच नाही. वरणाने भाताची चव किती बदलते– पण चौदा आण्याला शेरभर तुरीची डाळ रोज आणायला जमत नाहीं– वाटीभर तूपच प्यावे अशी आण्णाशास्त्रींना इच्छा होते. जिभेवर सगळीकडे काटेच उगवले आहेत. आमसुलाच्या तिखटान हे काटे विरघळून जातील– आण्णाशास्त्रींचे तोंड ओलसर होते. आमसुलाच्या तिखटाच्या वड्या असाव्यात. जिभेवर त्यातली एखादी वडी चोळली की, तिच्यावर कसे पाणी उभे राहील—

" पाणी काढलय आंघोळीला– उठा– " गंगी सांगते.

आण्णाशास्त्री उठतात. कमरेवरच्या धोतराच्या काचातून हात फिरवतात. आणि मग एक लांबलचक जांभई देतात. एवढ्यात राजा त्यांच्यापुढ येऊन त्यांच्या उघड्या तोंडापुढ हात पसरून धरतो. आण्णाशास्त्री त्याच्यावर खेकसण्याच्या आतच राजा त्यांना सांगतो,

" आत्ताच आंघोळ नको– अजून जेवायला जायला बराच अवकाश आहे– "

" भोसडिच्या, चेष्टा करतोस काय माझी ? "

" छे, छे, माशा थांबवीत होतो. "

आण्णाशास्त्री राजाला मारण्यासाठी हात फिरवितात. पण राजा स्वयंपाकघरात पळून गेलेला असतो. त्याच्यामागे शेवटपर्यंत लागण्याची तसदी आण्णाशास्त्री घेत नाहीत. ते पुटपुटत राहतात, " कार्ट्याला या गुणानच कुणी बोलावत नाही. वाळव्याला अभिषेकासाठी जा म्हटल तर हितच रात्री सिनेमा बघून मित्राच्या घरात झोपल जाऊन—

जाऊन आलो म्हणून खोटंच सांगितल कार्ट्यानं— "

घरात दर्भ नाहीत. बापूशास्त्र्याला दर्भ घ्यायला सांगितलं पाहिजे. आण्णाशास्त्री दाराबाहेर पाहतात. पावसाचे भुरगट चालूं असते. ते

कपाळाला आठ्या घालतात. पण दर्भाच सांगितल पाहिजे. पावसातच तसेच बाहेर पडतात. बापूशास्त्र्याचे घर जवळच तर आहे. तेवढ्यातहि आपण कदाचित् भिजू ही कल्पना त्याच्या डोक्यात शिरत नाहीं. पावसाखाली अग चोरत, डबकी चुकवत ते बापूशास्त्र्याच्या दारात येतात. हाक घालतात,

" बापू ऽ ऽ "

" ओ ऽ ऽ, या— "

या म्हटल्यावर आण्णाशास्त्री आत जातात. बापूशास्त्रीच्या घरात स्वयपाकघर दारातच असते. बैठकीची खोली पाठीमागे असते. स्वयपाकघरात बापूशास्त्री मुगाचा लाडू खात असतात. तोंडावर अगत्य आणून ते आण्णाशास्त्रीना आत बोलावतात. बापूशास्त्रींची बायको :एका वाटीतून मुगाचा लाडू अण्णाशास्त्रीसमोर ठेवते. उदराच्या कानाएवढा तो लाडू पाहून आण्णाशास्त्री पिसाळल्यासारखे करतात. पण तेवढाच आधार झाला या विचाराने ते खायला सुरुवात करतात. लाडू खाऊन झाल्यावर बापूशास्त्रीच्या मडळींनी दिलेला कप भरून चहा घेतात. भरलेल्या कपामुळे मघाचा लाडवाचा आकार आण्णाशास्त्री विसरून जातात— मग ते जायला निघतात—

एवढ्यात त्याना दर्भाचे सागायचे आठवते. मग ते उभ्याउभ्याच बापूशास्त्रीना सागतात, " दर्भ तूच आण रे— मी आघोळ करून येतो— "

" हो, हो— "

बापूशास्त्रीच्या घरात घेतलेल्या चहाची उब पावसातून घरात येईपर्यंत निघून गेलेली असते. आत आल्यावर आण्णाशास्त्री आगरखा लहान मुलासारखा अस्ताव्यस्तपणे काढतात. आणि मग एक झक्क जाभई देतात. सदऱ्याचा बोळा तसाच खुटीवर टाकतात. आणि मग तसेच खुंटीकडे डोळे लावून उभे राहतात. बराच वेळ उभे राहतात—

" पाणी काढलय आघोळीला— चला— " गगी पुन्हा सागते.

आण्णाशास्त्री स्वयंपाकघरातून न्हाणीकडे येतात. न्हाणीत घगाळ्यातले पाणी वाट बघून बघून दमून गेलेले असते. त्यावर ताब्या चित्रासारखा पोहत असतो. अण्णाशास्त्री घगाळ्याजवळ जाऊन नुसतेच उभे राहतात. आणि

मग पुन्हा एक वाकडीतिकडी जाभई देतात. छातीवरचे केस चोळीत आळ्याकडे पाहात राहतात—

" आघोळ करा आता— " गगी पुकारते.

आण्णाशास्त्री ताब्या हातात घेतात. स्वयपाकघरातल्या स्वयपाकाचा वास घेत घेत ताब्या पाण्यात बुडवतात. त्या वासाने त्याची भूक चाळवली जाते. देशपाड्याच्या घरी हिचा स्वयपाक होत आला असेल. चटण्या-कोशिबिरी सटात भरल्या असतील. आमटीला उकळी येऊन गेली असेल. वडे तळून झाले असतील. खिरीला खवा लावून झाला असेल. दोन्ही भात कढाला आले असतील......

" आवरा आता, वेळ होत आलीय— " गगी सागते.

आण्णाशास्त्री भानावर येतात. भरलेला ताब्या डोक्यावर घेतात. त्या पाण्याने फक्त अर्धे डोके भिजते. असेच केव्हातरी घगाळातले सगळे पाणी सपते. आणि आण्णाशास्त्रीची आघोळ सपते. ते तसेच ओलेत्याने सोप्याला येऊन उभे राहतात. भिजविलेल्या धोतरातून पागोळ्या गळत असतात. दोन्ही हात पोटावर आडवे बाधलेले असतात. आणि नजर आळ्याकडे लावलेली असते. आणि मग काही वेळ गेल्यावर भर ओलेत्याने आण्णा-शास्त्री एक ओलसर जाभई देतात—

गगी येऊन पचा हातात देते. सागते,

" पुसून घ्या—दाडीवरच सोवळ्याच धोतर घ्या—"

आण्णाशास्त्री हाताचे कुलूप काढतात. टाचा वर करून हाताने दाडी-वरचे धोतर ओढतात. ते त्याच्या डोक्यावर कोसळते. आण्णाशास्त्रीना त्यातून लौकर तोड बाहेर काढता येत नाही. मग ते घाबरल्यासारखे करून तरातरा धोतर तोडावरून ओढून काढतात. अण्णाशास्त्रीना मग बराच वेळ निऱ्याच जमत नाहीत. शेवटी केव्हातरी धोतर नेसून होते. मग ते एक जाभई देतात. पुन्हा हात पोटावर बाधून तसेच उभे राहतात.

" गध लावा—" गगी सूचना देते.

आण्णाशास्त्री देव्हाऱ्याजवळ जातात. संबळीत गोपिचद हुडकतात. पण त्याना गध सापडतच नाही—कार्टं गधगोळीचा बैदुल करतय—अवलक्षणी—!

पण आण्णाशास्त्र्याचे हे शब्द ऐकायला राजा घरांत नसतो. तो मघाशींच बाहेर पडलेला असतो. एवढ्यात गगी गोपीचद घेऊत येते. अण्णाशास्त्री मग गध लावतात. जानव्याने एकदा पाठ चोळतात. जवळ आणून ठेवलेलं ताब्याच पळीपच्चपात्र हातात घेतात. आणि पावसाचे बारीक थेब उघड्या पाठीवर घेत, मनाने वरणभात कालवीत, देशपाड्याच्या घराकडे जायला लागतात ...

□ □ □

# घेरी

काय गर्दी आहे—काय उकडते आहे—घामाच्या धारा वाहताहेत—अशा तलखलीत एवढी माणस कुठं निघाली आहेत ? आपल्याला नाही का यावे लागले म्हणा—पण ही सगळी माणस आपल्यासारखीच अपरिहार्यतेमुळे निघाली असतील ? त्याना निघाव लागल असेल ? या अशा उन्हात, अशा उकाड्यात, अशा गर्दीत नाही तरी आनदान कोण प्रवास करणार ? —शर्ट घामान चिब झाला आहे. मानेवर, गळ्यावर चिकचिक ओथंबून राहिली आहे. जरा हाताची बोट फिरवली तर मळाच्या वळकट्या घामासकट हाताला चिकटताहेत—आणि हा कंडक्टर कुठ गेला आहे ? किती माणस ताटकळत थाबली आहेत. अनिश्चितता हा आजच्या जगाचा स्थायीभाव होऊन राहिली आहे—शेजारच्या बाईच्या काखेतले बोचके अगदी टेंडा-

जवळ येते आहे. कसला कुबट वास—पलीकडची लेकुरवाळी बाई घामानं थबथबून गेली आहे. घामान तिच कुकू ओघळल आहे. कोपऱ्यातल मूल उकाड्यान तळमळत आहे—किचाळत आहे—मोटारी पत्र्याच्या का करतात?

कडक्टर गडबडीने गाडीत येतो आहे. गर्दी त्याला अदबीने वाट करून देते आहे. तो सर्वांवर तिकिटासाठी कावतो आहे. खेकसतो आहे. उगीचच्च दात-ओठ खाऊन जोराने पच करतो आहे. कातडी पिशवीत मोड असूनहि सुटे पैसे मागतो आहे. सुटे पैसे नसतील तर गाडीतून खाली उतरवतो आहे—कुणालाहि त्याची कीव यावी—अशा उन्हाळ्यात त्याला खाकी कपडे घालावे लागताहेत. खाकी पोषाख ही जगात त्याची सर्वात नावडती वस्तु असली पाहिजे. या करकरीत कपड्यात तो घामाने न्हाला आहे—काय साल व्यक्तिमत्त्व आहे—गाडी निघाल्याबरोबर निघत आहे. गाडी थाबली की थाबत आहे. जिथ गाडी मुक्काम करील तिथ हा मुक्काम करील—खाकी व्यक्तिमत्त्व. शेवटच्या सीटवर जखडलेल. नव्या पैशाचा घोळ अजूनहि चाललेला आहे. कडक्टरला एक नवा पैसा—द्यावा लागेल. बिनहिशेबी नवा पैसा सुद्धा त्याला तसा लाटता येणार नाही—ज्याचा पैसा त्याला दिला पाहिजे—काल वाण्याने आपल्याला बोलावून घेतले. पैसे दिले तरच सामान मिळेल म्हणाला. अशा वेळेला साल काहीच्च कस बोलता येत नाही? वाणसामानाला किमत आहे की पैशाला? आणि त्याहिपेक्षा सुमित्रेचा चेहरा का केविलवाणा व्हावा? यात तिची काय चूक? चुलीला लाकड लागतात. आणि जाळ झाल्यावर वर काहीतरी शिजत ठेवाव लागत. किती सागितल तरी तिला पटतच नाही. पहिल्यादा तिच्या हातातले बिलवर काढून घेतले त्या वेळेला नवीन डिझाइनचे करून आणायला दिलेत हीच तिची कल्पना. न बोलता काढलेली बिलवर परत येतात होय कधी?—आता ती त्याचा विषयसुद्धा काढत नाही—

कुत्र मेल वाटत समोरच्च—कारणाशिवाय हे जीव जन्माला तरी कशाला आलेले असतात?—आणि गाडीचा वेग का वाढला आहे? एंजिनाची घरघरहि कानभर वाढली आहे. पण मोटारीच्या आवाजातहि कुत्र्याच्या शेवटच्या केकाटण्याचा आवाज अजून कानात घुमतो आहे—तो आवाज मोटारीबरोबर धावतो आहे—एका जिवाची छान सुटका झाली, कायमची—

पान खाऊन कोण थुकत आहे ? कितीतरी लोकांच्या अंगावर शितोडे आले. क्षणभर कावाकाव. आरडाओरड. कंडक्टरची दमदटाई–थुकणारानें अजिजीनें चूक कबूल केली. सर्वांनीं समजावून घेतले. साला वाणी का समजावून घेऊ शकत नाही ?–पण समजून घेण्याचा जगाने काही मक्ता घेतला आहे काय ?–मेथड मास्टरने सर्वांना समजून घेतलेच पाहिजे असा काही नियम आहे काय ?–कदम एकदा भांडला होता याबाबत. आपले तास पाहायची कुवत नाही याच्यात आणि खुळचट चुका काढतात–भाषा म्हणजे काय हे तरी कळतय का साल्याना ? ‘ डॅफोडेल्स ’ शिकवताना तुम्हीच जास्त बोलत होता असे मेथड मास्टरचे म्हणणे—कदम एल्‌एल्. बी. आहे-दोन वर्ष वकिलीचा अनुभव पाहून आला आहे–एल्‌एल्. एम्. करणार होता म्हणे–आणि आता तो इथ येऊन पडला आहे-सी. जी. ला स्वतःला एक पाय नसल्याबद्दल कधीहि वाईट वाटत नाही. पण इथल्या चाकोरीतल्या कुबड्याना तो कटाळला आहे–गोखले रीसर्च किंवा डेक्कन इन्स्टिट्यूटमध्ये सशोधन करत जगावं हे त्याच स्वप्न होत–पण साली स्वप्न कधी खरी होतात ?– सी. जी.–

गाडी का थाबली ? गाव आल वाटत एखाद. चला. पाच मिनिट मोकळ्या हवेत तरी उभ राहता येईल. अजून उन्हाची तिरीप कढत कढत दाह फेकतेच आहे–सोडालेमनच्या बाटल्या फुटताना मला उगीचच भीति वाटते. मारामारी करताना वापरतात म्हणे या बाटल्या–आपल्याला काय उपयोग म्हणा त्याचा–खिशात फीपुरतेच पैसे आहेत. निमाच लग्न केल्या-वर कुठला पैसा खिशात–काय साली माणस तरी भेटली आपल्याला–त्याना नड होतो म्हणून जवळजवळ सगळा हुडा लग्नाआधीच पोचता केला आपण. आपलेच ओझे कमी झाले म्हणा– पण सीमातपूजनाच्या वेळी शंभर रुपये कमी होते तर लग्न थाबवून ठेवलं–आपल्याला आता नाही जास्त वेळ थाबता येणार इथ. गाडी निघते आहे–हे काय ? मोटारीच्या चाकाला रक्त लागलं आहे–चाक फिरू लागलं आहे–रक्तहि फिरतं आहे–खाडकन् दार लागते–

केवढ्यादा दचकलों आपण–वास्तविक कुठे चालला आहांत हा प्रश्न

अगदी साधाच. कोल्हापूरला आपण काही चोरी करायला निघालों आहोत ?–काय साली पदवी आहे ! कदम म्हणाला होता, लॉचा अभ्यास करताना केवढ मन रमायच–त्यान उगीचच्च आठवणीच टरफल काढलं होत–लॉ ऑफ टार्टस्‌मध्ये आपल्याला सेव्हटी टू परसेंट मार्कस्‌ होते–परवा एक जानेवारीला वकिलीच्या पाटीच श्राद्ध करून टाकल. लावताना सत्यनारायण घातला होता–लोकाची उगीच फसगत व्हायला नको. पाटी बघून माणसं यायची–येणारी माणस काय देतात याचाहि अनुभव घेतला आहे. वकिलीच्या प्रोफेशनमधला रॉयलनेस त्या पाटीच्या आधीच गेलेला होता. मटणाच ताट आणि पानपट्टीवर केस चालवण आपल्याला जमणार नाही अस कदम म्हणतो–बाथरूममधले काळे कोट, भेटलो की सहानभूति दाखवल्याच नाटक करतात वकिली का सोडली अस म्हणण्यापेक्षा मास्तरकी का निवडलीत यावर खोच–मनातून सगळे जळफळतात–बाररूममध्ये झोपा काढायचे साले–जरा थाबायच होतत, धीर धरायचा होतात, म्हणतात–माणसाला निर्लज्ज धीर धरता येतो ?–निमान मात्र किती धीर धरला होता. तुला फार त्रास होतोय, माझ्या लग्नाच, दादा, पुढच्या वर्षी पाहू म्हणायची–पण कुठल्याच वर्षापुढ साला पूर्णविराम असतच्च नाही. वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ याच्यात काही माणसाच्या बाबतीत फारसा फरकच्च असत नाही. काळहि साला माणस पाहून बदलतो–बदललेल्या काळात शिक्षणाबद्दलच्या कल्पनाहि बदलल्या आहेत. शिक्षणाकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलला आहे. अपेक्षा बदललेल्या आहेत. बदललेला नाही फक्त शिक्षक. तो आहे तिथच्च आहे. टेनिसनच्या ओढ्यासारखा. ह–टेनिसनचा ओढा केवढा आत्मकेंद्री आहे–आपल्याला केंद्र आहे ? सी. जी. ला केंद्रच नाही–कदमच केंद्र हुकलेल–सगळीच केंद्र नसलेली वर्तुळं–

माझ्या एका तासाला हेतुकथनच चुकल्याच मेथड मास्टर खोतान सांगितल होतं. जवळच कदम उभा होता–तुमच्या जन्माचा हेतु कळलाय का–म्हणाला. नमस्कारान सावरलं–नमस्कार ही एक वस्तु जगात फार उपयोगाची आहे. फेकली की माणूस गार होतो. अधनंमधन नमस्कार ठोकले की, कॉलेजच्या इंटरनल मार्कांत पहिला वर्ग मिळून जातो. यंदाच्या वर्षातल्या फर्स्ट क्लासची यादीच कॉलेजमध्यें लागली आहे– नमस्काराची यादी–पण

साला वाणी नमस्कारालाहि भीक घालत नाही. निमाच्या लग्नात सतत हात जोडूनहि रुसणीफुगणीं झालीच–

पायाला रग लागली आहे. आज शेवटपर्यंत बसायला जागा मिळेल अस काही वाटत नाही. पायाची बोट, पिडऱ्या बधिर झाल्या आहेत–टाचेपाशी रक्त कसल ? मघाशी चढणाऱ्या माणसाच्या हातातल्या बॅगेचा पत्रा लागला वाटत. रक्त निळं झालय. निळ रक्त–रक्ताचीच खपली बसली आहे, राहू दे–पुढच्या बाकावर बसलेल्या माणसाचा कोपर पलीकडच्या बाईच्या खांद्यापर्यंत पोचतो आहे. बाई अग चोरून बसली आहे–नक्को हा प्रवास–तिच्या अगावरच पातळ काय छान आहे–सुमित्रेला खुलून दिसेल. निमाच्या लग्नातसुद्धा सुमित्रेला मनासारख पातळ मिळाल नाही–पहिल्या केसचे पैसे आले तेव्हा येतानाच सुमित्रेला बेगलोर साडी घेऊन आलो होतो–नवी कोरी घडी निमाच्या नणदेला द्यावी लागली. सुमित्रेपेक्षा निमाचच तोड चिमणीसारख झाल होत–बायकाना कपड्या-दागिन्याची हौस असते म्हणून कुणी सागितल ?—

रेगे काही हौस म्हणून बी. टी. ला आल्या आहेत ? बायकानीं वकिली करायला काय हरकत आहे ? आपल्या वर्गातल्या कुसूम कुलकर्णीच प्रॅक्टिस कस छान जमल होत. आता मॅजिस्ट्रेट आहे म्हणे कुठतरी–साला काळा गाऊन काय रुबाबदार दिसतो–आपण काळा कोट शिवला नाही ते बर झाल. कपडा माणसाची अब्रू घेतो कधी कधी पण कदम पर्वा करत नाही. काळा कोट घालून कॉलेजला येतो. मेथड मास्तर गोसावी त्याला म्हणाले होते, “ कदम तुम्ही इकडे का आलात ” म्हणून. फटकळ लेकाचा–“ या जगातच का आलो ते कळत नाही, सर, ” म्हणाला–प्रिन्सिपॉल पारसानिसापेक्षा आपण मानसशास्त्र फार चागल शिकवू अस रेगे म्हणतात. मानसशास्त्र इतक सथ आणि रटाळ शिकवाव लागत ? सथपणा हा अपरिहार्यपणे रटाळच असतो ?–पण स्ट्रक्चर मेथड रटाळ नसते अशी अलीकडची अपरिहार्य आणि भाबडी कल्पना आहे. हसत खेळत शिक्षण घेण अपरिहार्य असत ? ‘ ब्युगुल ’ कविता, शिकवीत असताना ब्युगुल वाजवण अपरिहार्य असत ? अपरिहार्यतेच कडं केवढ मोट्ठं असतं. पण व्यक्तिगत ते लहान होत होत गळ्याभोवती घट्ट बसतं,

श्वास गुदमरण्याइतकं—काय साला मोटारीचा आवाज आहे—डोक भरून गेलं आहे—गुदमरून गेलं आहे—जगातले सगळे आवाज बद व्हावेत. म्हणजे तरी जरा डोक्याला शातपणा मिळेल. तसा शातपणा कुठला मिळणाराय म्हणा. तो शेवटी मिळतो—अगदी शेवटी—

गाडीची घटा केवढ्यादा वाजतेय. डोक्यावर टोला पडावा तशी. बापरे —काय गर्दी आहे बाहेर. आता उतरण्यात अर्थ नाही. स्स्— केवढ्यादा पायावर पाय पडला—बधिर बोट विव्हळावी इतका—आणि त्याच याला काही वाटलेलहि नाही. सुखी आहे बिचारा—नाही—तो बिचारा नाही. सुखी आहे पण बिचारा नाही—बिचारा कदम—बिचारा सी. जी. —बिचारा रेगे—बिचारा आगठा—साला अगठा ठणकायला लागलाय. ठणकू दे. किती वेळ ठणकेल ? कोल्हापुरात आगठ्याची वास्तपुस्त कोण करणार ? घरात असतो तर सुमित्रेन आयोडिन लावल असत—नाहीतरी फारच हळवी आहे सुमित्रा. काल सोडलच नाही आपल्याला. अष्टग्रही दिवशी मी सोडणार नाही म्हणाली —अस छान व्याख्यान देता आल असत तिला—पण साल बायकाच्या डोळ्यातल पाणी फारच दाट असत.—काही चालतच नाही.

कोपऱ्यातल मूल फारच किचाळायला लागल आहे. तहानेन व्याकुळ झाल आहे. आणखी थोडा वेळ त्याला पाणी मिळाल नाही तर रडता रडता ते तसच गप्प होईल अशी भीति वाटते. त्याची आई त्याला जास्तच थापटते आहे, आपटते आहे. आई झाली म्हणून काय झाल ? चालत्या गाडीत ती कुठल पाणी आणणार ?—पाणी काय गार आणि गोड असत नाही ? कित्ती वेळ झाला पाणी पिऊन—घरातून निघतानाहि पाणी प्यालो नाही. भलाजी मारवाड्याच्या दुकानातून पैसे घेतले आणि गाडीची वेळ झाली म्हणून घरातली पिशवी घेतली, आणि लगेच स्टॅन्डवर आलो—आऽहाहा—साठलेल्या थेबाथेबाची घामाची एक धारच पाठीच्या कण्यातून कमरेपर्यंत आलेय—गार पाण्याने आघोळ केली पाहिजे गेल्यावर—पण तेवढा वेळ कुठला ? ‘ सी मी पर्सनली ’ अशी प्रिन्सिपॉलची तार आली होती न काल. हजरी भरलेली नाही. इयर वर्क कम्प्लीट झालं नाही न अजून—पुन्हा त्या खोताला भेटाव लागणार—काय साला मेथड मास्तर तरी—शेवटच्या बाकावर नुस्ता बसलेला असतो. मोकळ्या बाकालाहि व्यक्तित्व

असत. मेथड मास्तर व्हायला व्यक्तिमत्त्व काय करायचय म्हणा—' निर्झरास ' शिकवताना प्रश्नाची लाबड कशाला ? बालकवींनी वर कपाळ बडवून घेतल असेल. कुठल्या गावचे बालकवि ?—

गावातन निघताना देशपाडे स्टॅडपर्यंत आला होता. स्टॅडवर गाडी येईपर्यंत कितीतरी बोललो आम्ही. कटु प्रसगात कितीतरी बोलता येते. देशपाडे हाडानच कवि आहे. लेकाच्या डोळ्याच्या कडाच ओल्या झाल्या—— सहानुभूति ही अशी दाटून आणते–आणि सहानुभूति नसली म्हणजे जगात कोण कुणाच नाही–फायनल पाठाच्या वेळी एक्झॅमिनर्समध्ये विद्यार्थ्यांच्या उलनच्या पॅटबद्दल गप्पा चालतात. आडनाव पाहून मार्कस् टाकण्याची सोय किती सोपी झाली आहे——शशी भिडेला अभ्यास करायच कारणच नाही. देखणी आहे न——पाठाची टाचण काढायच्या निमित्तान खोत सारखा तिला खोलीवर बोलावतो म्हणे——चव्वेचाळीस दिवस मोजून घालवायचे——पण नुसत्या चव्वेचाळीस दिवसानी भागणार आहे काय ? पुढ तीस वर्ष काढायची आहेत तीस वर्ष–तीनशे पासष्ठ गुणिले तीस– गुणाकार करायचे काय धाडस आहे–गुणाकार न करणारी माणस मात्र मजेत आहेत. चद्रशेखर कसा तुष्ट आहे. या कॉलेजला आपण आलो म्हणून आपल्या आयुष्याच सार्थक झाल अशी छटा सतत बेट्याच्या चेहऱ्यावर असते. प्रिन्सिपॉलचा लाडका विद्यार्थी बनून राहिलाय साला——

काय गाडी धावते आहे. जमीन फिरते आहे. रस्ता फिरतो आहे. डोकहि फिरल्यासारख, भिरभिरल्यासारख वाटत आहे. अस सगळ जग फिरल की, माणूस आत्महत्यासुद्धा करायला तयार होतो–काय सालं आयुष्य आहे–आपल्याला जगण नक्को वाटल तरी सख्या बहिणीन आत्महत्या करायची ठरविली आहे हे कळल्यावर पोटातली आतडी तटातटा तुटलीं. वेडपिस होऊन आपण किती धावाधाव केली–मुलाला घेऊन भरदुपारीं निमा अबाबाईच्या थड देवळात डोळे मिटून बसली होती. " सोसवेना, काही सुचेना, म्हणून मुलाला घेऊन इथ बसले आहे, दादा " म्हणाली. जगण्याचं आणि जगविण्याचं केवढ. प्रचंड बळ आलं आपल्याला त्या वेळीं—

गाडी थांबते आहे. नाकं आलं आहे वाटतं. दोन तीन माणस पावली

करायला उतरताहेत. आता एक दोन मिनिट खाली उतरायला हरकत नाही—बापरे—काय मुग्या आल्या आहेत पायाला—इतराना न दिसणाऱ्या या मुग्या सगळ्या आयुष्यालाच लागल्या आहेत.—चाकावर अजूनहि रक्त आहे. इतकं फिरूनहि, झीट येऊनहि त्यान जागा सोडलेली नाही. रक्त अस चेगटच असत. त्यावर या मुग्याच सोडल्या पाहिजेत. असख्य मुग्या कानावरून, कानशिलावरून फिरताहेत. कानातून आत जाऊन डोक्यात शिरल्या आहेत. त्यानी प्रज्ञा खाऊन टाकत आणली आहे. रक्ताचा फडशा पाडत आणला आहे. हाड पोखरली आहेत. मग बाकीच्या शरीराचा काय उपयोग? ह—कशाचा उपयोग आहे या जगात? लॉ ऑफ टॉर्टस्ना? बहात्तर मार्कांचा? पदवीचा?—अबाबाईच्या देवळाचे मात्र अनत उपकार आहेत. पण थड देऊळ सर्वांचीच मन थड करत का? अस देऊळ कुठ सापडेल?—

साहेब, गाडीकड नुसत बघत काय उभा राहिलाय, चला की लौकर, या कडक्टरच्या दटावणीन गाडीत चढाव लागल. आता पाच मिनिटात स्टॅड येईल. उतरल पाहिजे. प्रिन्सिपॉलकडे गेल पाहिजे. खोताला भेटल पाहिजे. तास घेतले पाहिजेत. मेथडन घेतले पाहिजेत. रुक्ष चाकोरीतून जायला पाहिजे. मेथड मास्तराचे शेरे सहन केले पाहिजेत. पेपर लिहिले पाहिजेत. या सगळ्या गोष्टी कान पाडून केल्या पाहिजेत—रस्ता काय फिरतो आहे—जमीन फिरते आहे. डोक भिरभिरत आहे. मुग्या अगावरून हिडताहेत. कानातून आत जाऊन डोक्यात शिरल्या आहेत. त्यानी प्रज्ञा खाऊन टाकत आणली आहे. रक्ताचा फडशा पाडत आणला आहे. हाड पोखरली आहेत—मनाची चाळण करून टाकली आहे—पण तरीहि सगळ्या गोष्टी तोड शिवून केल्या पाहिजेत. केवढी अपरिहार्यता ही—चाकोरीत अडकवून घेतलं पाहिजे. चौकटीचे खिळे असे सर्वांगात ठोकून घेतले पाहिजेत. हे सगळ सहन केल पाहिजे—कारण एक एप्रिलला सुमित्रा माझी वाट पाहणार आहे जगान एप्रिल फूल करून टाकलेल्या या देहाला, या मनाला सुमित्रा जवळ घेणार आहे—थापटणार आहे, झोपविणार आहे—कित्ती अवकाश आहे अद्याप—चव्वेचाळीस दिवस—चव्वेचाळीस गुणिले चोवीस—चव्वेचाळीस गुणिले चोवीस—काय जमीन फिरते आहे—माणसहि फिरताहेत—सगळ जगच फिरत आहे—सगळ जगच फिरत आहे......

# झुंज

मी आत गेलो त्या वेळी मैदान माणसानी भरून गेल होत. झुंजा नुकत्याच सुरू झाल्या होत्या. तिसरी झुज चालली होती. आज बावीस झुजा होणार होत्या. मुख्य झुज शेवटी होणार होती. आणि मत्र्याच्या हस्ते बक्षिससमारभ होणार होता.

मी सभोवार नजर टाकली. आमचे लोक कुठ बसलेत ते न्याहाळल. दुसऱ्या टोकापर्यंत दृष्टि पोहोचतच नव्हती. चिक्कार माणस. आधाशी डोळ्याची. लाबून त्याचे नुसते टिपके दिसत होते. चेहऱ्याचे काळे ठिपके. फेट्याचे पाढरे. पुढे पुढे अगदी बारीक ठिपके. अगदीं लाब काळ्या पाढऱ्या रगाचा एक जाड थर. मैदानाभोवती मोठा तट होता. तटाकडेने एक फेरी मारण्याचे मी ठरविले......

दुपारचा एक वाजला होता. उभ्या उन्हाच रिपण

चाललं होत. सरावलेल्या लोकाना त्याचं काही वाटत नव्हत. पण कुतूहलान आलेले तुरळक शहरी लोक रुमालाचा पखा करीत, घाम निपटीत. काही गॉगल्स मधून, काही हाताच्या तळव्याचा आडोसा करून पाहात होते. दूर दृष्टीच्या लोकानी छत्रीची तरतूद केली होती. पण एका छत्रीत सात-आठ मुडकी घुसत होती. सगळ्याच्या नजरा मात्र उन्हाला छेदून बैलाची लढत बघण्यात गुतल्या होत्या. एक बैल दमून पळाला. आणि हुल्लड उठली. पण लगेच तो धरला गेला. दावी बाधून नेला गेला. शिग वाजल. चौथी झुज सुरू झाली. मला माझे मित्र दिसले. तिथ थोडा वेळ बसलो.

सहा इच रुदीच्या गॅलरीच्या फळीवर नीट बसता येईना. दोन मित्र घेऊन फिरत राहायच ठरवल. ढिल्या चपलानी बारके खडे उडवीत, हातात छडी घेऊन चालताना रुबाब येतो. तसा आखाड्याभोवती फिरू लागलो. ' उस्तादा 'च्या भूमिकेत. मध्ये मध्ये बैलाकडे पाहात. ही लढत चागली जुपली होती. एक बैल चागला उचापुरा, लाब शिगाचा होता. जोडीदार खुजा होता. पण गट्टीसारखा. अत्यत चपळ. पाढरा घोट. सापडेल तिथ वार करणारा. त्यान कौशल्यान थोडी सूट घेऊन प्रतिस्पर्ध्याला जोराची धडक दिली. लोकानी एकच गिल्ला केला. त्याना वाटल आपणच धडक दिली !

बैल खेळत होते तिथ त्याच्या खुरानी धूळ उडत होती. आखाड्या-भोवती कळकी चिवे रोवून कापाऊड तयार केले होते. त्याभोंवती कडे करून लोक बसले होते. मैदानाकडेच्या तटाला लागून गॅलरी होती. गॅलरीच्या व लोकाच्या मधून मोकळी जागा होती. त्यातून फिरायला मोकळीक होती. प्रवेशद्वाराजवळ सरकारी अधिकाऱ्यासाठी खुर्च्या टाकल्या होत्या. त्याच्यापुरते वर तट्ट्याचे छत होते. त्यामुळे खुर्चीवरल्या लोकानी सावलीची मच्छरदाणी पाघरल्यासारखे वाटत होते. मैदान खूप मोठें असल्याने एकदम दोन दोन झुजा लावल्या जाऊ लागल्या. मघाच्या चपळ बैलाने आडव होऊन दुसऱ्याला मानेजवळ भोकसल. त्याबरोबर तो उच लाबशिग्या पळाला. लोकानी धाकट्या बैलावर शाबासक्याची खैरात केली.

हौशी लोकाना उन्हाची दाद नव्हती. शहरी लोक मात्र घामेजून गेले

होते. त्याचे रुमाल पिळून काढण्याइतके भिजून गेले होते. छत्रीवालेहि घाबरे झाले होते. छत्रीचे कापड तापले होते. सळ्या तापल्या होत्या. छत्रीच उलट ओझ झाल होत.चेहरे खारेचिंब झाले होते. जिभा कोरड्या पडल्या होत्या. सोडालेमनच्या बाटल्या फुटत होत्या. मीठ लावलेल्या काकड्या चुरचुरीत ओठानी चट्टामट्टा केल्या जात होत्या. आणि अशा उन्हातहि काही तलफी लोक विड्या पीत होते. घाम पुसण्याचे, खाण्याचे, धूर सोडण्याचे काम इतर अवयव करीत होते. डोळे मात्र फक्त लढत पाहात होते. अगदी मन लावून. सूक्ष्म हालचालसुद्धा टिपीत. नाहीतर थोडे जरी दुर्लक्ष झाले तर एखादी धडक चुकायची. एखादी झेप चुकायची ! एखादा डाव चुकायचा ! एखादा पेच, एखादी चुणूक चुकायची !

नंतरच्या काही बैलांनी मात्र त्या आसुसलेल्या डोळ्याची निराशा केली. कारण ते लढलेच नाहीत. काहींनी तर मुजरासुद्धा घेतला नाही. काहींनी तर कमाल केली. एकमेकाकडे पाहिलेसुद्धा नाही ! उस्तादानी त्याना काठ्यानी चुचकारून एकमेकाजवळ आणले तरीहि त्याची तोंड खालीच. जमिनीवर गवत धुंडाळत......आणि हेच लोकाना नको होते. थोडीसुद्धा झीट नाही म्हणजे काय ? हा नेभळेपणा पाहायला आम्ही आलोय काय ? झुंज लवकर सपल्याचे दुःख नाही. पण त्यात तरी झटापट ? त्यात तरी एखादा वर्मी तडाखा ? एखादे कसब ? थोडीशी चपळाई ? हा त्या डोळ्याचा अपेक्षाभग होता- त्या डोळ्याना काही रसरशीत पाहायच होत......... शेवटी शेवटी मात्र राखीव खोड आणली गेली. त्यानी पुन्हा लोकात उत्साह आणला. पुन्हा डोळे जास्त किलकिले होऊ लागले. जिवण्या जास्त रुदावू लागल्या. माणसाच्या गर्जना मैदानात घुमू लगल्या .....मध्येच एखादी फुसकी लढत होई. लोक ओरडत. बैल नागराला जुपायचा सल्ला देत.

चार वाजून गेले आणि बहुतेक सगळ्या झुंजा सपल्या. शेवटची राखीव झुंज तेवढी राहिली. बैलाची नावे पुकारली गेली. आणि लोकानी कान टवकारले. दोन बाजूंनी दोन बैल आत आणले गेले. एकाचे नाव भालदन. दुसरा पतग. दोघेहि शरीराने गच्च. पतग मैदानाच्या कडेला उभा राहिला. संथपणे त्यान मैदानातील लोकावरून नजर फिरविली. आणि निवातपणे कान हालवले. अधेमधे शेपटीची चवरी सहजच अंगावरून उडवी.

उभं राहण अगदी सथ. एखाद्या सराईत पहिलवानासारख. भक्कम अगलोट. शिसं भरलेला गरगरीत पुठ्ठा. हत्तीच्या पाठीसारखी, जाड कातड्याची गर्दन. त्यावर ऐटदार-झोकदार वशिड. शिग आखूड. पण जाडजूड-वजनदार. डोळे निर्विकार. स्वतःच्या सामार्थ्याचा आत्मविश्वास असलेले. मालदन मात्र सळसळीत अगाचा. गुळगुळीत, लाब आणि भाल्यासारखी टोक असलेली बाकदार शिग असलेला. लाबट मान. त्यावर वशिडाचे सिहासन. अंगात रग, मस्ती. ती रग, ती मस्ती त्याला एका जाग्यावर एक क्षणहि टरू देत नव्हती. रक्त सळसळत होत. पुढच्या पायाच्या खुराने त्याने जमीन उखडली. बारके दगड भीतीने लाब मागे पळाले . .

लोकानी दोघाचहि कौतुक केल. राखीव बैलाची राखीव लढत. तसा लोकाचा राखीव उत्साह भरून आला. लोकानी आपल्या नजरा त्याच्या-वरून ओवाळून टाकल्या. बैलाच्या शक्तीबद्दल, रूपाबद्दल बोलणी सुरू झाली. पतगाचा मालक त्याला तुपात भिजवून चपातीचे मुटके चारतो अशी बातमी कुणीतरी सागितली. मालदनला न्याहारीसाठी बारडीतून अडी मिळतात याहि बातमीला दुजोरा मिळाला ! काहींनी पतगाची बाजू घेतली. काहींनी मालदनची. पतगाची बाजू घेणारे त्याच्या यशाबद्दल त्याच्यासारखेच निर्धास्त होते. मालदनची बाजू घेणारे त्याच्यासारखेच अवखळ झाले होते.

गुरवाने शिग फुकले आणि आवाजाची वलय आकाशाला जाऊन भिडली. बैलाच्या मालकानी आडवी दावी काढून घेतली. पतग धिमी चार पावल टाकून पुढ आला. मालदन डिरकी टाकून धावतच आला, आणि त्याने वाऱ्यासारखी पहिली टक्कर दिली. पतगानेहि ती कौशल्याने झेलली. ‘ खट्ट ’ करून आवाज सगळ्या मैदानात घुमला. लोक चेकाळले. दोघाच्या मुडक्याची घट्ट मिठी बसली. पतग आपले भक्कम पाय जमिनीत रोवून उभा होता. मालदनचे चैतन्य त्याच्या अगाबाहेर साडत होते. ते पाहून मैदानातल्या प्रत्येक माणसाला वाटत होते, आपणच दोन हात करतोय ! लोकाच्याहि अगातल रक्त पळायला लागल ! तेवढ्यात चपळाई दाखवून

मालदनने पतंगाच्या कानाचा गड्डा ढोसकला. पतंगाला झीट आली. त्यान मालदनला रेटीत खूप माग नेल. आणि लोकानी दातओठ खाल्ले !

सूर्य क्षितिजाकडे कलू लागला तरी बैलाचे रक्त गरम होऊ लागले. त्याबरोबरच माणसाचेहि ! मालदन सूट पडू देत नव्हता. पतगाची झीट वाढली. त्याने वाकडी मान करून दणकून धडक दिली. आणि मालदनच्या मानेत त्याचे शिंग घुसले. चिखलात धुसल्यासारखे. सगळी शक्ति एकवटून त्याला उचलले. मालदनचे पुढचे दोन पाय अतराळी झाले. लोक उठून उभे राहिले. मालदनला मानेत सुरी फिरल्यासारख वाटलं. नाकपुड्या फेंदारत त्यान आपल्या भाल्याच्या पात्यान काकरा काढला. पुढच्या पायाच्या खोबणीपासून वशिंडापर्यंत पतगाच कातड फाटल ! लोकानी प्राण डोळ्यात आणले.. दोघेहि रक्तबबाळ झाले. माणसानी पण टाळ्या पिटल्या ! कौतुकानी !

झुज लागून सव्वा तास झाला होता ! दोघेहि त्वेषाने भिनले होते. राग डोळ्यातून उतू जात होता. प्रत्येकाला दुसऱ्याचे तुकडे तुकडे करावेसे वाटत होते. चार डोळे आगीन पेटले होते. श्वासोच्छ्वास होताना पोट हालत होती. नाकपुड्यातून लाळ गळत होती. पण दोघाची जिद्द होती. कुणीच हार खायला तयार नव्हता. दोघाचीहि शरीर बधीर झाली होती. त्याना माराचे भान नव्हते. जखमाचे नव्हते. रक्ताचे नव्हते. समोरच्या प्रतिस्पर्ध्याला फाडून टाकायच, फासून काढायच एवढच समजत होत.

एक तास वीस मिनिट सर्वस्व पणाला लावून दोन वीर लढत होते ! दोन त्वेषाची टक्कर चालली होती. दोन झिटी झटपटत होत्या. एक तास वीस मिनिट !... मग दोघहि दमले. दोघानीहि माना बाजूला केल्या. लोकाच कुतूहल पापण्यावर येऊन बसल. कुठला बैल पळतोय ? कोण जिकतय् ? पण दोन चार सेकंदच. पुन्हा झटापटीला सुरुवात झाली.

मैदानात मध्ये दोन जनावर हट्टाला पेटली होती. आणि इकडं माणस हट्टाला पेटली होती. कोण दमतय पाहायच ! रथारथाचा एकेक डोळा करून काय निकाल लागतोय इकड सगळ्याच लक्ष लागल होत.

पुन्हा विश्राति–पुन्हा लढत. पुन्हा विश्राति–पुन्हा लढत. अगदीं समंजसपणे चाललेली लढत ! काही म्हाताऱ्या लोकानीं सुचवले, झुज

साडवावी. तेव्हा सगळ्या मैदानान एकमुखान गर्जना केली, ‘ नाही ! निकाल लागला पाहिजे ! निकाल लागला पाहिजे ! ’

पुन्हा विश्रांति. पुन्हा लढत. पुन्हा विश्रांति. पुन्हा लढत. दोघानाहि पुढच दिसेना. दोघाच्याहि अगातल वार गेल. दोघेहि पूर्णपणे दमले. त्याचबरोबर त्याची झीट सपली. त्याचा राग सपला.

पण माणसाचा समुद्र खवळला होता. त्याच्या मनातली झीट अजून उतरली नव्हती ! त्याच्या धमन्यातल रक्त अजून गरमच होत ! त्याच्या दाताची पकड अजून घट्ट होती ! त्याना निकाल पाहायचा होता ! कोण पळून जातो ते पाहायच होत ! कोण हारतोय् ते पाहायच होत ! कोण जिकतय् ते पाहायच होत ! त्याच्या नावाचा जल्लोष करीत आपले फेटे आभाळाला भिडवायचे होते ! मैदान भरभरून हसायच होत ! विजेत्याकडे कौतुकानं पाहायच होत ! अगदी जवळून पाहायच होत !

□ □ □

# पीळ

रात्री भजन संपलं आणि खांद्यावर घोंगडी टाकून शंकर माळी मंडपाबाहेर पडला. चुन्यानं मळलेली तंबाखूची चिमूट तोंडात टाकून तो आपल्या शेताच्या दिशेनं निघाला. त्याच्या शेतात आज मेंढरं बसली होती. त्यासाठीं त्याला वस्तीवरच मुक्कामाला जायचं होतं. रस्त्यावरचे खडे रगडीत ओठावर दोन बोटं उभी ठेवून त्यानं पिचकारी मारली. आणि तो गावा-बाहेर पडला. खांद्यावरची घोंगडी थोडीशी लपेटून घेतली. उघड्या वावरातूनच तो निघाला. त्याचे जाडजूड पायताण काळ्या मातीत रुतत होते. पण प्रत्येक पावलागणिक उडणारी माती पायांना लडबडून जात होती. एवढेच अंधारात समजत होते. देशपांड्याचा मळा पाठीमागे टाकून सुताराचे शेत त्याने पार केले, आणि तो आपल्या वावरात आला.

शेताच्या पलीकडल्या बाजूला वागर लावली होती. मेंढराच्या आवाजानं शेत भरून गेलं होत. त्याचा शेणकट वास शंकरच्या नाकात भरून गेला. तो वागराजवळ गेला. चंद्या धनगर बकरी मोजून लावत होता. परवाच्च व्यालेल्या पाढऱ्या मेंढीने त्याला पाहताच 'बेऽऽ' केलं. इतक्यात शकरची चाहूल लागल्यामुळ कपाळावर मधोमध डागलेल, लाब निमुळत्या तोडाच उच्च कुत्र भुकू लागल. चंद्यान ते मेंढरू उचलून घेतल आणि तो वागरीच्या बाहेर आला. शकर माळ्याला त्यान पाहिल. मेंढरू खाली ठेवीत कुत्र्यावर खेकसून आदबीन त्यान विचारल, "कवास आलासा ?"

"एवढ्यातच. बिऱ्या कुट हाय ?"

"खोपीत तबाकु वडतुया."

"भाकरी खाल्लीसा का ?"

"खाल्ली."

"मेंढर मोजलीस ?"

"चार इसा आन् सा हैती."

एवढ्यात बिऱ्या आला. वागरीच्या भोवती त्यान एक फेरी मारली आणि ते बारक मेंढरू मुसकटीत घेऊन चंद्या बसला होता तिथ तोहि टेकला. म्हणाला, "सकराण्णा, तुमी व्हा आडव आता. आमची कुत्री हाइती लई तिकाट "

शकरमाळी खोपीत गेला. बैलाला वैरणीची मूठ टाकली, आणि परत आला. वागरीजवळच घोगड आथरल. डोक्याचा पटका उशाला फेकला. तुकारामाचा अभग म्हणता म्हणता चुटक्या वाजवून एक जाभई दिली, आणि तो आडवा झाला.

मध्यरात्र उलटून गेली. वार सुटल. बिऱ्या आणि चंद्या उठले. दोघे दोन बाजूंनी वागरेभोवती फिरून आले. मेंढर झोपली होती. एखाद मध्येच झोपेत ओरडे. तेवढाच आवाज. मेंढराच्या ताज्या खतात मिसळलेला वारा त्या दोघांच्या नाकात भिनून गेला. दोघानीहि घोगड्याची खोळ केली. चंद्यान ते बारक मेंढरू जवळ घेतलं. आणि ते लवडले...

काहीतरी खसपस वाजल आणि शंकर माळी जागा झाला. त्यानें घोगड्याची मसकट किंचित बाजला करून किलकिल्या डोळ्यानीं बघितलं.

तीन चार गडी मेंढराजवळ आलेले त्यानं पाहिले. प्रत्येकाच्या हातात भाला. टापर बाधलेली. वागर ओलाडून एकजण आत गेला. एक मेंढरू उचलल. शकर माळ्यान अग चाळवल्यासारख केल. त्याबरोबर बाकीचे तिघे गडबडीन निघाले. चौथ्यान मेढरू छातीबरोबर धरून घाईघाईन वागरे-बाहेर उडी मारली. त्याचा वागरेत पाय अडकला. आणि तो सपशेल तोडावर पडला. मेढरू आणि भाल्याची काठी बाजूला पडली. शकर माळ्यानं चटदिशी घोगडी फेकून दिली. पालथ्या चोरावर त्यानं झेप घातली. आणि एका हातान बोब ठोकली. बिऱ्या चद्या खाडदिशी जागे झाले. आलो आलो म्हणून त्यानी आरोळी ठोकली. ती ऐकून आस-पासच्या काही लोकानी हाका दिल्या. बिऱ्याने येऊन त्याची मानच दडपली. सगळा आरडाओरडा ऐकून इथ बरेच लोक आहेत अस समजून ते तिघेजण पसार झाले होते.

सकाळी सगळ्या गावात बातमी. चावडीत चोर धरून ठेवला आहे म्हणून. पोरसोर कुतूहलान येऊन बघून जात. चावडीसमोरच्या पटागणात लोक जमले होते. चोर मात्र स्वस्थ बसला होता. त्याचा भाला आता त्याच्याजवळ नव्हता. अगावर फक्त लगोट. ओठावर नुकती कुठे मिसरूड फुटलेली. तरणाबाड. थोडासा उभट. तालमीतल्या मातीचा रग लगोट्याला लागलेला. तोच रग त्याच्या अगाचाहि. पिळदार दड. भरदार छाती. कानाची भजी झालेली. माड्याचे स्नायु गुडघ्याच्या डोळ्यावर बाजूला कललेले. लोखडी पिडऱ्या. पाय खाली सोडून, खाबाला टेकून, जोत्यावर तो थडपणे बसला होता. त्याच्याजवळच तराळी कोरबी बसले होते. तिथल्या पालपट्टीवर पोलीसपाटील वह्या चाळीत होते.

चावडीसमोरून जाणारा प्रत्येकजण चोराच्या शरीराकडे कुतूहलानें पाही. पण त्याचबरोबर शकर माळ्याचे कौतुक करी. स्वतःचा जीव धोक्यात घालून माळ्याने त्याला पकडले होते. त्या सगळ्याच्या हातात हत्यारं होती. पढरीची वारी नियमाने करणारा शंकर माळी वारकरी होता. त्याच्या गळ्यात फक्त तुळशीची माळ होती. जरा चूकभूल झाली असती तर आज सकाळच्याला शंकर माळी दिसला नसता. चावडीसमोर दीपमाळेच्या कट्टयावर बसलेल्या शंकरची प्रत्येकजण पाठ थोपटी.

पंचांमध्ये गावातलीं वडीलधारी माणसं होती. तशीच बेचाळीसच्या चळवळीत योगायोगान महिना दोन महिने तुरुगात जाऊन आलेली टणक देशभक्त पोरहि होती. वशपरपरेनं पुडाई चालवत असणारे काही गुंडहि त्यात होते. देवळापुढल्या पटागणात ही पचायत जमली. तोपर्यंत चावडीतला महार सख्या रामोशी आणि बाब्या रामोशी याना घेऊन आला. पचायतीतल्या बाळासाहेबान त्याना विचारल, "काय वळखतोय का ह्यो?"

"आ, ह्यो तर पेठचा बाळ्या रामूशी."

मग काही वेळ बरीच बोलाचाली झाली. पलीकडल्या सोसायटीच्या चुनेगच्ची इमारतीत ते सगळे बाळ्याला घेऊन गेले.

सोसायटीच्या माडीवरच्या हॉलमध्ये भली मोठी सतरजी आथरली होती. कडेला एक टेबल खुर्ची होती. लगतच कपाट होत. बैठकीच्या गादीसमोरच डेस्क होत. तिथ सोसायटीचा सेक्रेटरी बसला होता. बाकीची माणस जागा मिळेल तशी बसली होती. बाळ्या खाली जमिनीवरच बसला होता. समजुतदार माणसानी त्याला सागितल की, आपल्या साथीदाराची नाव साग म्हणजे आम्ही तुला सोडून देऊ. फक्त बाकीच्या सगळ्या लोकाची नावं साग. यावर बाळ्यान तोडच उघडले नाही. तेवढ्यात बाबासाहेब बाळ्याजवळ आला. म्हणाला, "आणि कोण कोण होत तुझ्याबरोबर?"

तरीहि बाळ्या गप्पच राहिला. बाबासाहेबान खाट्दिशी बाळ्याच्या मुस्कटात दिली. सगळा हॉल दणाणला. बाळ्यान फक्त मान फिरवली. पुन्हा बाबासाहेबानं दुसऱ्या थोबाडात मारली. विचारल, "कोण कोण होत तुझ्याबरोबर? त्याची नाव साग."

मानेला थोडासा हेलकावा देऊन बाळ्या म्हणाला, "मला ठाव न्हाय."

राजा देसाई पळत पळत आला आणि त्यान 'बक्क' दिशी बाळ्याच्या पाठीत लाथ हाणली. पुन्हा त्यान उघड्या पाठीवर, दडावर, सापडेल तशा लाथा हाणल्या. श्वास रोखून धरून बाळ्या निमूट बसून राहिला. लाथाच्या हेलकाव्यान हलला तेवढाच. राजा देसाईन दातओठ खात आणखी एक लाथ मारून विचारलं, "तुझ्या आयला, साग. आणि कोण होत?"

"मला ठाव न्हाय."

बसलेली सगळी माणसं चिडली. कुणीहि उठून त्याला दोन दोन लाथा मारू लागला. बाबासाहेब जास्तच चिडला. ‘ फट् ’ करून आणखी एक कानशिलात मारून त्यान पुन्हा विचारल, “ नाव साग सगळ्याची. ”

तरी बाळ्याच्या तोडाची मिट्टी तशीच. बाबासाहेब लोकाना म्हणाला की, याला आपल्या गावातला कुणीतरी साथीदार असला पाहिजे. त्याशिवाय पेठचा रामूशी आमच्या हित काय येतोय. आजपर्यंत कधी कुणी नाही, आणि...त्याच चिडीत बाबासाहेबान जवळच बसलेल्या सख्या आणि बाब्या रामोशाना विचारल, “ तुमच्याकडच आला होता का नाही हा ? शकर माळ्याच्या रानात जायाच कुठ ठरवल ? ”

सख्या, बाब्या एकदम म्हणाले, “ आमाला काय दिकून ठाव न्हाय बाबासाब. ”

“ भडव्यानू, पेठला पावन हाइती न्हव तुमच ? ”

“ त्यो सद्या रामूशी पावना आमचा. बाळ्याचा आन् त्येचा कायबी सबध न्हाई. ” कोपऱ्यात बसलेला उच्च छलाटा आल्या न्हावी उठला. आणि त्यान बाळ्याला एक लाथ मारली. आल्या न्हाव्याचा पटकाच पडला....

तेवढ्यात जिन्यावरून पळतच शकर पाटील वर आला. तो म्हणाला, “ थाबा, तो तसा नाही बोलायचा. ती भाल्याची काठी कुठाय ? ”

शकर पाटलान बाळ्याला एक लाथलून उताणा निजविला. डोक्याजवळ एकाला बसवून बाळ्याचे दोन्ही हात उताणे जमिनीशी दाबून धरून ठेवायला सागितले. त्याच्या माड्यावर आडवी काठी ठेवली. आणि एका टोकाला दोन माणस, दुसऱ्या टोकाला दोन माणस बसवली. त्याच्या गरगरीत माड्यात ती काठी रुतून बसली. चार चार बोट खळगा पडला. हात झिजाडून बाळ्याने उठण्याचा प्रयत्न केला. शकर पाटलाने खाडदिनी थोबाडींत मारली आणि विचारल, “ साग नाव. ” माड्यात काठी रुतली. आणि दोन्ही बाजूला स्नायु टम्म फुगले. पाचच मिनिटात भयकर रग लागली. रक्त साकळू लागल. डोळे लाल झाले. बाळ्या एकदम ओरडला, “ सागतो, सागतो; सोडा. ”

लोकानी त्याला मोकळा केला. बाळ्या उठून बसला. खाली मान

घालून त्यानं माडग्यावरून हात फिरवला. शंकर पाटील त्याच्याजवळ चवड्यावर बसला आणि म्हणाला, " कोण कोण होतं ? "

खाली मान घालून घुमेपणान बाळ्या म्हणाला, " मला ठाव न्हाय ! "

शंकर पाटील खवळला. दातओठ खाऊन त्यानं बाळ्याला आणखी एक जोरात कानफटात लगावली.

सोसायटीतल्या घड्याळान बाराचे ठोके दिले. वरचा पत्रा तापला होता. त्याची धग बसलेल्या सगळ्या माणसाना नकोसे करून टाकत होती. बसलेल्यापैकी काही माणस पटका काखेला मारून एकवर एकवर जेवून आली. जाता जाता प्रत्येकजण बाळ्याला एखादा दणका का होईना पण मारून जात होता. बाबासाहेब त्याला पुन्हा पुन्हा सागत होता,

" लौकर साग. पाटील गेल्यात इस्लामपुरला. आत्ता फौजदारला घेऊन येतील पोलिसाच्या ताब्यात दिल्यावर कळल मग तुला. भडव्या, चटणी भरतील ते. "

बाळ्यान ठरलेलेच उत्तर दिले, " मला ठाव न्हाय. "

पुन्हा त्याला उताणा केला. आडवी काठी टाकली. चौघेजण त्यावर बसले. बाळ्याच्या माड्या टरर् फुगल्या. तटतट्न आल्या कणकीसारख्या. त्याच सगळ अग भरून आल. त्याच्या कसदार अगाला घाम सुटला. पण लालभडक डोळ्यातून एक थेबहि सुटला नाही. पुन्हा तो ओरडला, " सागतो, सागतो, सोडा. "

पुन्हा त्याला मोकळा केला. पुन्हा बाबासाहेबान विचारल, " साग. "

" मला ठाव न्हाय ! "

माणस बाहेर जाऊन येत. कुजबुजत. फौजदार यायची वेळ झाली आहे. तेव्हा निशाणी होईल अस मारून चालणार नाही. एवढ्यात भगवान खराडा खिदळतच माडीवर आला. खिशातून त्यान एक शेणातला किडा काढला. बाळ्याला उताणा करून तो त्याच्या बेंबीत सोडला. वरून पटक्याचा शेवट बाधला. आणि बाळ्याला मोकळा सोडला. शेणातल्या किड्याला आत पोखरायची सवय असते. तो किडा वळवळू लागला. आणि बाळ्या गडबड करू लागला. पटक्याची गाठ पाठीमागे होती ती त्यान झिंजाडली. तेव्हा शंकर पाटलान त्याचा कान जोरान पिरगाळला. किडा आत

कुरकुरू लागला तसा बाळ्या गडबडा लोळू लागला. आपल आतडं कुणीतरी चिमट्यात धरून ओढतय असं त्याला वाटू लागल. अक्षरशः बाळ्यान जमीन उखडली. तरीहि त्याला सोडल नाही. तो सागतो, सागतो म्हणून ओरडू लागला. तरीहि कुणी लक्ष दिलं नाही. लोक खदखदून हसू लागले. बाळ्यान आकात केला. तो थरथरू लागला. खरच सागतो म्हणून त्यान जोरात किचाळी मारली. त्याला मोकळा केला. पोट झाडून बाळ्यान किडा खाली पाडला. आणि लगेच पायान चिरडून टाकला ! बाळ्यावर लाथाबुक्याचा पाऊस पडला. सगळे लोक त्याच्यावर तुटून पडले... मग बाबासाहेब पुढ झाला. म्हणाला, "थाबा. तो नाव सागतोय आता." घामान चिब झालेला बाळ्या उठून बसला. भयकर दमला होता तो. तोडाच कुलूप मात्र तसच होत. बाबासाहेब हळूच त्याच्याजवळ जाऊन बसला. पाठीवर हात ठेवून म्हणाला, "बाळ्या, साग बघू आता !"

खोल दबलेल्या आवाजात बाळ्यान उत्तर दिल, "मला–ठाव–न्हाय !"

थोड्याच वेळात फौजदार आले, चौकशी झाली. पचनामा झाला. मोटारीत फौजदार पुढच्या जागेवर जाऊन बसले. पाठीमागे दोन बदुकवाले पोलीस असलेला बाळ्या काडण्या बाधलेल्या हातानी गज धरून मोटारीत चढला आणि मोटार सुरू झाली.

□ □ □

# गवत खाणारा वाघ

कोन हाय त्ये ?–ऑ ?–हाड्–तू हाइस व्हय–बाबू काय आजून नदरत न्हाई. आज येतो म्हनलावता. जुदळा पाक कापाय आलाया–येकला पोरगा. पर आसून नसल्यागत–पर नडीकडीला येतुया हेबी उपकारच–आजून पत्त्या न्हाय–दिस कलाय आलाय. जुदळा सम्दा पिवळा पडून वाळूनशान गेलाय. हिरव्यागार पानाचा पाचोळा झालाय–आपल्यागतच–इळ पाजळून आनल्यात रत्नान. पर चालिवनारा थकला आता–परमेसरा–अरारारा–कबारनूकबार गेली–येरवड्याच्या जेलातन दोन परूस भित्तीवनं उडी टाकलिवती तवा हीच कबार झनानली सुदीक न्हाय–उडी मारल्याव माजरागत सप्पय पायाव हुब न्हायलोवतो -हारनागत उड्या मारीत गाव गाटलवत. घरात आल्याव बायकु किंचाळलीच. तिच्या तोडाव पालता हात ठेवला

आन् सम्दी कर्तुकी सांगिटली—तिच काळीज सुपागत झाल—एक का दोन, सात वर्साच फराऱ्याच जिन काडल रानच्या वाऱ्यात अगालाबी लागायच. गर्दन भरून आल्याली— तवाधरनच बाबू घरात टरना— त्येच्या आइला म्या मारल म्हनून माज्याव राग—पर ग्वजाळिच्याला यवड टकुरित उमगत न्हाय—तुज्यासाटीच म्या सम्द केल्याल—तेच सात हजार आज आरत तर आस हाल का झाल आस्त ? कराडची बॅंक लुटून सात हजाराच्या कोऱ्या करकरीत नोटा बाबूच्या आइच्या हातात दिल्याल्या. रुपायाला रुपायाची किमत हुती तवाच्या वक्ताच सात हज्जार रुपये—काबेरीच्या सक्या रामुशाला सोडवापाय पैस लागल तवा तिच्याकड मांगिटल—खुळ्याची आवलाद. बायलीन सम्द्या नोटा गाडग्यात पुरून ठेवल्याल्या. उकरून काडल्याल्या गाडग्यावच फडक सोडल तर सम्द्या नोटा वाळवीन खाल्याल्या. पाक पीट करून टाकल्याल गाडग्यात. त्यो चुरा बोटाव घेटला आन झिटच आली. कोपऱ्यातल टिकारन घेटल आन् दिल झटक—काय आकरित घडतया एकेक—बायली आवलगामी वार लागला आन् बाबूच्या आइचा परानच गेला—काळ पानी भोगल त्यापाय—येरवड्यातनच आलो पळून—फरारी असतानाच तिसर लगीन केल. मच्छिंद्रगडाखालच्या माचीच्या धर्मा रामुश्यान ल्येक दिली आपली. लगीन लागल्याव गडाव जाऊन आलो—जग जितल्यागत गडाच्या तटाव हुबा व्हतो रत्नाला सग घेऊन—बाबूपरास आसल च्यार वर्साचा फ्योर—आपल लगीन हुईस्तवर टिकला कसातरी—लगीन दिल्याव गेऽऽल बायकूला घेऊन इस्लापुरला न्हायाला—

काय राजागत हुतो आपून तवा. म्हादू रामूशी आला. म्हनल की, गाव कापायच चळाचळा. आता म्हादूमामा म्हनत्यात सम्दी. मामाच झालाय आपला—काय तवाचा रुबाब—लाबडा कोट घालून काडतुसाची माळ गळ्यात आडकिवल्याली. सर्ज्यासगट गावात पाऊल टाकल की, गाव गारीगार हुयाच—घोड आसाव तर सर्ज्यागत—बाराशाला घेटल्याल तवाच्या दिसात—बळीच्या पकागत पाडरा धोट—गाजरागत नाकपुड्या—देन्या कुबारानं सागरोबाच्या खिडीत ढाक दिली आन् शेनोली ठेसनात गाडी गाटून गडी म्होर सराकला—सर्ज्याला आपुन वायच जरा टाच दिली तर आगीनगाडीच्या म्होर त्वाड काडून कराड ठेसनाव देन्याला गाटला—

कान हुब करून एकडाव दौड मारली मजी वाऱ्यागत—जनावर मानसा-परास शेनं वाळव्यात पोलिसानी गराडा घातला, तर फुलागत नदीपार करून आपल्याला पड्याल न्हेल. जातीच घोड पान्याला भेत म्हनत्यात. पर सर्ज्याला पानी न्हाइ, जिमिन न्हाइ, राइझुड्रूप न्हाइ—पेटच्या बाळ्या-कडं धाडलावता पारभर कामापाय–तवाच पेटचा बाळ्या नाईक गेला–वळाबे फौजदाराची पयली गोळी सर्ज्याला लागली. गोळी खाऊन सर्ज्या आर्दा भैल पळत हुता–त्येच्या मातीलाबी जाया घावल न्हाय—

काय काय त्येगार केल वळाबे फौजदारान—डोळ इगळागत करून हातातल्या चाबकान कुनालाबी फोडायचं. इस्लापुरच्या गार्दी चौकात मारायचं कुनालाबी—वजाड्र्याचं श्येम्या पाटील पानाचा पुडा द्याला गेल. तवा त्यो घरात न्हवता. श्येम्यान पुडा त्येच्या मालकिनीच्या हातात दिला. पुडा हातात द्याला आन वळाब्या याला गाट पडली. माज्या बायकुला काय देत हुतास म्हनूत ततच फोडला श्येम्याला—पाच हज्जाराच बक्शिस हुत आपल्याला पकडायचं. तरीबी दोन वर्स घावलो न्हाय आपून. तवा गोळीचा हुकूम कलो वळाब्यान—आपल्यासाटीच पेशल नेमणूक होती त्येची. खवळाखवळायच आन् गप पडायचं—रत्नाचा निरोप आला म्हनुनशान एकडाव आपुन गावाकड आल्यालो. सम्द्या कापुसखेडला येडा घाटलावता त्येन. तीनशे शिपुर्डी आन् पाच फौजदार आनलीवती त्येन संग—खराड्याच्या वाड्यातन भितीवन उडी मारून मडपामागल्या लिंबाव झेप घेटलीवती आपून. सम्दी रात लिंबाव काडली—हुडकून हुडकून कटाळली शिपुर्डी—एका काकत बंदुक आन् दुसऱ्या काकत बॅटरी घालून पाटचं ठ्या नाटली आपून—बारा सेलाची बॅटरी आपली—उजेडाची गोळी दोन मैलाव जायाची—बाबल्याला काय मारल त्येनी. रगात वकलावता. रगतात्या आन् बाबल्या मला भाकरी पोचिवत्यात म्हणून कुनीतरी कागाळी केल्याली—पान्यातली घानबी वर आल्याबिगार न्हात न्हाय. हलका कान कुनी केलता तेबी गवासल मला—त्या माळ्याला मोटवरन वढून उडिवला—पाचवा खून त्यो आपला—कसलं काळीज आपल तवाच—रगात बगिटल मजी हुरूप याचा—बाबल्याबी थकलाय आता—शिनव्या आसावा तर आसा. मी गावात आलों की माजी बंदुक बाबल्या वागवायचा.

रंगताल्या बातम्या द्याचा. वळाब्याच्या शपता सागायचा. त्येची नेमबाजी सागायचा. लई ऐकल—दिस बुडायच्या वक्ताला एकडाव पेटवड्याव बसलोवतो मम्दी. शिळुप्याच हालक वार सुटल्याल. पानीबी पळून पळून थकल्याल. पाकर घराकड निगाल्याली. आन् वळाब्या फौजदाराच्या कायन्या चालल्याल्या. घेटली बदुक बाबल्याकडली आन् पान्याच्या ऐन्यात बगून आबाळातल्या कावळ्याव धरला नेम. वडला घोडा आन् पाडला कावळा पाट्टदिशी—पुना कवाच रगताल्यान वळाब्याच नाव घेटल न्हाइ—

उरनातला पोलीस आलता एकडाव कापुसखेडला. पावन्याकड. घाऽवल तडाक्यात. फडाडा-शिव्या दिल्या वळाबे फौजदाराला आईभनीवन. त्येला इचारलं माजा माग काडाय आलायस का न्हाइ म्हनून—वळाबे फौजदाराचा बा आला पायजे मला धराया—गडगडा लोळाय लागल त्ये पोलीस. त्ये खऱ्यान आलत पावन्याकड. हौसाबाय पाटलिनीन सागिटल आमचाच पावना हाय म्हणून तवा सोडला त्येला—

दिस बुडला—बाबू आज न्हाइ याचा—उद्याच्याला ईल येरवाळी. च्छलाव आता—गावदरीगत श्यात आपल तर घरला जाया तासभर लागतुया—कटाळा कटाळा आला सम्द्याचाच—सुटून आल्याव हे श्यात घेटल. वयमान जाइल तस पडून ऱ्हावस वाटाय लागल. पिकवाव श्यात. जगाव गुमान. काग्रिसाच्या राज्यात काय सुदरना. नेल्र्याच्या रानात घळीत घावलो आपून—न्हायतरी नशीब तालेवारच आपल. केशी चालू झाल्या सम्द्या. सात खून आन् सोळा दरवड ह—सम्द आकीरितच. हाकडल्या सम्द्या कोडतात सुटलो आपुन. कोलापूर जिल्ह्यात आडाकलो. तरीबी खुनाच्या केशी सुटल्या—सम्दी सोळा वर्साची शिक्षा झाली—सा म्हइन्यात देवासचा शाजी म्हाराज आला गादीव. आन् सुटलो आपून—घराकडं आलो तवा बातम्या घेटल्या. पेटचा बाळ्या नाइक गेला—काबीरीचा सक्या सपला—सम्द्या टोळीचा इस्कुट झाला—लईऽवार सुटल्यालं काग्रिसाच. सम्द्याच हातच बादत आनल. आमी घालत हुतो दरुडं. आन पाडऱ्या टोप्या घालून ही पोर काय करीत हुती ? पर त्येच्या कर्तुकीला लई मोट्टी नाव मिळाली—आमा हातनबी लईऽपाप घडल म्हना. माळ्याला उडिवल्याव त्येच्या बायकुनं मारल्याली किंकाळी आजून कानात हाय—

पर मला धरून द्यापाय बातमी कशाला देवावी ?—काळ लई बदाल्ला—दिस फिरलं—त्याच गावात हात भागलत बसलोय आपुन. शेपुट कापल्याल्या वागागत—

साट्याची तळी आली वाटत—ह—आजून निम्मा रस्ता सुदरायचा हाय. पायाला गोळ येल्याती. लाडेगावच्या रानात पोलिसास्नी हुलकावनी दिलीवती तवा भिगरीगत कोलापूर गाटल वत. तवा कोलापूर मजी आसरा हुता. हाकडल पोलीस तकड जायाच न्हाइत आन् तकडल पोलीस हाकड याच न्हाइत— बेळगावात दोन म्हयन सरदारागत काडलं—कुनाचा शेर कुनाकड आसल—ततल्या खानावळीतल्या कुत्र्यान काय जीव लावलावता—आपून जेवाय बसलोवतो आन् पोलीस आल—खिडकीतनच उडी मारली. एक शिपुर्ड माग आल तर कुत्र्यान उडी मारून पिडरीच फोडली त्येची—फुड चार दिस डोळ्याम्होरन जाइना—आन् आता पोटचा पोरगा जवळ न्हाई—

नागऱ्याचा धोडा आला—बसावं आता वाइच धाप लागतीया. कडुस पडाय झालय, आदुक दिसाय लागलय—शिदु पाटलाचा वाडा—तवा आपुन गावात आलो की भेटून जायाचा. काय लागल सवरल तर सागा म्हनायचा. आता त्यो आपल्याकड बगायबी तयार न्हाई—त्येचा पोरगा फुडारी झालाय न्हव आता—कसलीतरी टोपी घाटली आस्ती टकुऱ्याव मजी जमल आस्त कायतरी—पर काळी म्हना पाडरी म्हना टोपी कवा घाटलीच न्हाय—कुटबी वड्या वगळीला निजाय लागायच. उशाला ध्याला पटकाच बरा वाटायचा. कानाला वार लागायच न्हाय—काय न्हाय—पायाला मुग्या आल्याता—-उटाव—

पताच्या वाड्याच्या जळक्या भिती वाडुळ हुब्या हैती. पर काळी झाल्याली मातीबी मानस न्हेल्याती. कोन इचारनारं हाय ? गादी मेल्याव घर जाळ्ळी सम्दी बामनाची. तवा आपुन तुरुगात होतो कोलापुरला. आपुन आसतो तर आस हून दिल नसत. सम्द्यानी कडी करून पंताच घर जाळल-ह्येला काय टगिगिरी म्हनत न्हाइत. केवढ घरान पताच—पताची म्हातारी मोट्या काळजाची. कवा साचं सकाळच आल तर धार काडून पोराच्यासंग दुद प्याला द्याची. एकडाव लइ भुक्यालो व्हतो

आपुन. तर धार काढल्याला सम्दा ताब्याच आपल्या म्होर ठेवला— म्हातारी म्हनायची, नाईक, संबाळा आमाला—मी सागायचा, गावाचा रखवालदार हाय मी तुमास्नी कसल भ्या हाय ? बिनघोरी आसा— दुदाचा ताब्याच तोंडाला लावल्याव व्हटाच्या कोपऱ्यातन साडल्याल दुदाच थ्येंब आजून नदारत्याती—काय तवाच दिस हुत—त्यो वकुतच कसा तरनाबाड—दुद आन् दारू यकाच चवीन पिऊन दुदाच्या चवीला जागायचा काळ—तसं लई पाप घडल हातन पर कवाबी दरवड्याला गेल्याव बाईमानसाच्या आगाव हात टाकला न्हाय. पोरासोरास्नी ताप दिला. न्हाय. नायकाच्या वसात जल्मून मिटाच्या खड्याला कंदी इसारलो न्हाय....

पर आता दुदाची चव गेली. आन् दारूची न्हायली. झिट यापाय ध्याचा सराव रक्तातच भिनलाया. जग्या कोरबी काल देवळाम्होरं कायबी बरळत हुत पिऊन. दारू पेल्याव बडबडाय कशापाय लागतया ? मला का ठाव न्हाय का ? पचत न्हाइ भडव्यास्नी. चैनी करत्याती. राइच शिपभर पेल्याती आन् पाटीभर बडबडत्याती—लई वगाळ नाद—रत्नी रडायची. गळ्याची आन घालून सागायची, ही येवडी धान पिऊ नगासा— पर येळ झाली की आज्जून काळजाची घालमेल घालमेल उडतीया. आतड्याव सुरकुत्या झाल्या आस्तीला—पर न्हाय पेल तर आगाची कायली कायली हुतीया—घोटभर घेटली मजी जिव कसा थडगार—चिरा पडल्याल्या जिमनीव पाऊस पडल्यागत——

रत्नालाबी ठाव झालय आता. साच येळ झाली की आपुनच कोप भरून देती. तिला ठाव झालया वाइच घुटका घेटला तर चार घास वरबाडाय येत्याती. न्हाय तर जिबला चव काढव—त्येच्याबी परास, दारु ही सम्द इसरायच औशिद हाय—ढसाढसा ढोसल मजी आगावच क्यासबी हुबं न्हात्याती. मद्यान कशी गुगीत जाती. कवा ज्वाप येती तेबी कळत न्हाइ—हे सम्द रत्नाला ठाव झालया—त्यापाय तीच देती कोप भरून— बायकाची जात लइ सोशिक आन् मायाळू—गड्याला इक्ती समजूत कवाच गवसायची न्हाय—पयली बायकु मेल्याली. दुसरीचा खून केल्याला. पर रत्नान सम्द ग्वाड करून घेटल—तवाच्या वक्ताला कोनबी सगट न्हायलं

आस्तं. नाइकबाच्या जत्रंला गेल मजी जत्रंत जमल्याल्या सम्द्या फुकन्या उगं आगमागं गोडा घोळायच्या–पर हालात कुनी कुनाच नस्तं रत्नासिवाट. रत्नीशिवाय कुन्नीकुन्नीसुदिक न्हाय आपल्याला–तिच्या माडीव मरान-सुदिक भ्या न्हाय दावायचं—

"बाबू आला न्हाइ जनू?"

"ईल उद्या येरवाळी."

"न्हायतर मी करीन जुपी कापनीला."

"तुज्या येकलीच्या हातान काय रेटतया ... पर ईल त्यो— पोटचा पोरगा हाय— कायतरी आतड्याचा धागा आनील त्येला कळ—"

पाय धुया पानी ऊन ठेवलया रत्नान— पायावल्या शिरा कशा तरारा फुगल्याता. ऊन पानी लागल मजी वायच बर वाटतया. शेकल्यागत— टेकाव वायच देवाम्होर. पायरीव— गुइदा भटजीचा ह्यो वाडा घेटला आपुन आल्या आल्या. पर वाड्यात इट्ठबाच देवळ. डाव्या आगच चार खन घ्याला तयारच हुइना भटजी— ह— काय मानसं देवाला भेत्याती— त्येला काळजी आस्ती तर ह्या घरावतरी इस्तु कुना हातन ठेवला आस्ता? —आपून आल्याव रकमाइची ब्याइच कुनीतरी उपटून टाकली— गाव-कऱ्यानी कसला कालवा केला भडजीव— रामुश्याला वाडा दिला. तवा त्येनच आसली कर्तुकी केली आसल— मासमासकाड शिजायच आता वाड्यात— देवाला बर पडायच न्हाइ— काय कळवळा वारकऱ्यास्नी देवाचा— माळा आडकिवत्याती गळ्यातल्या खुटीला आन् मासमासकाडं खात्याती भडव— धरम सागत्याती— इक्ती देवाची काळजी हुती तर सम्द्यानी राकायच हुतर हे घर— जुगार खेळत्याती मडपात राडच— शानपना शिकिवत्याती— आर, त्यो काय डोळं झाकून न्हाय बसल्याला— सम्द दिसतय त्येला—

वास काय सुटलाय— रत्नान आज मास आनलय वाटत— हारन-काळजी माजी तिला. चार फुट खोबऱ्यागत चावली आन् वर वायच आळवणीच पानी प्याल मजी भरल्याली छाती कशी लक्क होतिया—इट्ठलाला काय वंगाळ लागायच न्हाय. आपल्या धर्मात मासमासकाडाचा

काय इटाळफाटाळ न्हाय--खंडोबारायाला बकरं दिलं कीं त्यो भलं करता आमा रामुशाचं— मानसाच्या आन्नाचा निवदच देवाला लागतो— ”

“ उटा जेवाय— ”

“ बाटली कुटशी हाय ? ”

“ आज न्हाइ घेटली तर चालायच न्हाइ का ? ”

“ लइ शानपना नग करूस. तुला ठाव हाय सम्दं— ”

बाटलीचं बूच उचकी लागल्यागत उचाकतंय. खळा खळा खळा कपात आवाज येतुया. खंडुबाराया ऽ ऽ ऽ ...... थ्थु.... स्स...... कुनी देन्या साख्यान आडल्यालीच का ? काय नवसागर घालत्याती भडव--घसा खाजिवल्यागत खाली उतारतय-- गोव्यात एकडाव काजूची घेटलीवती-- पिटात पानी वतून दुद करत्याती राडच-- पर...

“ रत्ने ”

“ जी ”

“ हात य. माज्याजवळ. बस. ”

“ उटा आता जेवाय. भाकरी झाल्यात्या माज्या.”

“ व्हय ग, बस वायच्— ”

“ बसून कस भागल ? काम कोन करील मग ? ”

“ काम आपून दोगंबी करू. उद्याच्याला आपुनच खुरपू जुंदळा. ”

“ न्हाय पर बाबू ईल उद्या. ”

“ न्हाय आला तर कामं न्हातिलीं काय माजी ? लई त्येगार नगं कुनाचं--खापलुन टाकीन एकेकाला— ”

“ पर उटा तुमी आता जेवाय. घासभर खावा आन् निजा गुमान— ”

“ ह. च्छल—मास कवा आनलंस ? ”

“ वाड्रूळ. ”

“ रत्ने, माझ्यासाटी लई करतीस बग तूं—मला इसरु नगस—”

“ दोडानू, काय बोलतायसा—उटा—च्छला जेवाय. ”

“ च्छल. वाड. लइ भुका लागल्याता. आग पडलीया पोटात आग. वाड. इचि बायला, वाड— ” □ □ □

# भूक

भर दुपारची वेळ होती. उन्हान सगळ आवार रटारटा शिजत होत. भिवाच्या शेतात नागर चालला होता. तव्यासारख्या तापलेल्या जमिनीच पोट फाडून ढेकळ भराभर बाहेर पडत होती. सकाळपासून काम नेटानं चालल होत. बैलाची पोट वरखाली होत होतीं. ताबूस काळसर नाकपुड्यावर घामाचे बिदु चमकत होते. तोंडाना फेस आला होता. वेसणी ओढून ओढून नाकपुड्या कचल्या होत्या. तुकतुकीत अंग घामानं च्चिब झाली होती.

थोड्या अंरावर कडब्याच्या पेंढ्या उभ्या करून तयार केलेली खोप आपले बारके तोंड जमिनीकडे वळवून, पापण्या डोळ्यावर ओढून निमूटपणे उभी होती. शेजारीच सोडलेली गाडी उन्ह सहन न होऊन, डोकं टेकून, जमिनीत तोंड खुपसून विसावा घेत होती,

उन्हान घाबरं होऊन तिनं धरणीवर हात पसरले होते. धावा तापल्या होत्या. साटीखालीं सांवलीचा गडद कवडसा पडला होता. आजूबाजूला पालापाचोळा निर्जीव होऊन पडला होता. जवळची झाडं ताठरल्यासारखी गप्प उभी होती...

अशा उन्हाच्या रकात पौंडावर चालणार एक कुत्रं तिथ आलं. गव्हाच्या रंगाच, तुकतुकीत पुठ्ठयाच. पण त्याच पोट भकाळीला गेल होत. तहानेनं आणि भुकेनं त्याला धाप लागली होती. वीतभर ताबडीलाल जीभ बाहेर काढून ते 'ल्हा' 'ल्हा' करीत होत. त्याबरोबर त्याच सगळ अग हालत होत. कान पडलेले होते. डोळे ओलसर झालेले होते. शेपटीचा झुबका वाखासारखा लोंबत होता. चालताना नखानी माती उडत होती. ते गाडीखालच्या सावलीला येऊन उभं राहिल.

थोड्याच वेळात त्याची धाप थाबली. जीभ आत गेली. आणि ते इकड तिकडं पाहू लागल. पण पोटात भुकेची गुरगूर चालू होती. कित्येक दिवसात भाकरी नावाचा पदार्थ न पाहिल्यासारख त्याला झाल होत. पोटात कालवल्यासारख होत होतं. मग ते तिथून खोपीत गेलं. तिथ एक घोगड पडल होत. एक कासरा पडला होता. बाकी काही नव्हत. कुत्र्यान काळ्या मातीला नाक लावून तिथली जमीन हुगली, कासरा हुंगला. घोगड्यात तोंड घालून ते विस्कटल, पण त्याला काहीहि मिळाल नाही. सावलीलाहि त्याला निवात बसवेना. त्यान गाडीकड पाहिल. बावकाडाला चिंधीसारख काही-तरी दिसल. तिथूनच त्यान वर मान करून हुगल्यासारख केल.. ...

पुढच्या बाजून गाडीत चढून त्यान बावकाडाला बाधलेल्या गाठोड्याचा वास घेतला. भाकरीचा आणि कांद्याचा खरपूस आणि ओलसर वास त्याच्या नाकात भरला. अचानक त्याची वाखासारखी दिसणारी शेपटी हलली. तिचा ऐटदार गोंडा झाला ! कान उभे राहिले. त्याने पुन्हा एकदा ते गाठोडे काळ्या कुळकुळीत आणि ओलसर नाकपुडीने ढोसकले. लसणीच्या चटणीच्या खमग वासाने त्याचे नाक भरून गेले ! नाकावाटे तो वास त्याच्या उपाशी पोटापर्यंत गेला ! त्याची नाकपुडी फुरफुरली. गाठोड्याचा एक पदर तोंडात धरून त्यानं हिसडा दिला. सगळच गाठोड तोंडात आल. पण आतल्या भाकरीच्या ओझ्यानं तें तोंडावर आपटून गाडीच्या चाकामधून

खाली पडल. कुत्र्यानं टुणकन् खाली उडी मारली. तोंडाने ते गाठोडं दातात धरून त्याला एक झिजाडा दिला. अर्धमेल झालेल्या त्या गाठोड्यातून बदाबदा भाकरी खाली पडल्या. चटणी सगळीकड साडली. कादे घरगळत लाब जाऊन पडले. कुत्र्यान आधाशासारखे भाकरीचे लचके तोडण्यास सुरवात केली. मान वाकडी करून तुकडे गटागट गिळण्यास सुरुवात केली. . .

मनासारखं काम झाल आणि वेळहि बराच झाला, म्हणून भिवानं नागर थाबवला. दुपारची भाकरी खाऊन थोडा विसावा घ्यायचा आणि पुन्हा काम चालू करायच. चालायच थाबल्याबरोबर तीन चार बैल एकदम मुतली. पायाखालच्या काळ्या वावरातील ढेकूळ फरफरून फुगून आले. पण पुन्हा तिथेच खळगे पडले. शिवाळ तशीच बैलाच्या खाद्यावर ठेवून सगळे मिळून खोपीकड आले. खोपीच्या आडोशाला पाण्याचा खापराचा माठ भरून ठेवला होता तो थोडा वाकडा करून ओंजळीत पाणी घेऊन सगळ्यानी चुळा भरल्या. ओले. हात तसेच डोळ्यावरून, मिश्यावरून, सगळ्या तोडावरून फिरविले. तसेच कोपरापर्यंत फिरवून कोरडे केले.

तेवढ्यात भिवाच गाडीच्या बावकाडाकडे लक्ष गेल ! आणि तो जवळजवळ ओरडलाच, ' आर तिच्या, हितल्या भाकरी काय झाल्या ? ऑ ? कुत्र्या-बिऱ्यानं पळिवल्या काय ?' त्यानं इकड तिकड खूप पाहिल. पण मागमूसहि नाही. अशा वेळेला आणि अशी चेष्टाहि कोण करणार नाही. कुत्र्याचच काम हे—सगळे गडी भुकेजलेले बाहेरच्या उन्हासारखीच पोटातहि भुकेची आग उसळलेली; आणि भाकरी नाहीत. सगळ्या पैरंकऱ्याना त्यानच भाकरी आणल्या होत्या. पैजेनं भाकरी खाणाऱ्या पैरकऱ्याना उपाशी राहावं लागल होतं. भिवा खूप खूप चिडला. जळफळला.

एवढ्यात खोपीच्या आडोशाला काहीतरी खसखसल. कुत्र्याचा माग हेरलेला, चिडलेला भिवा एकदम खोपीआडून पुढं आला—गाडीखाली सगळीकडे पसरलेल्या भाकरीच्या तुकड्यामध्ये कुत्र बसलं होतं. त्याच लक्ष चटकन् भिवाकडे गेलं. आता काय होणार हे जाणून त्या कुत्र्यान गाडी-

खालींच, जमिनीवर दबून, अवसान घेतलं; आणि धूम ठोकली. भिवाचा सगळा राग, सगळी झीट, सगळे अवसान उफाळून आले ! एक शिवी हासडून, खोपीत खोवलेली कुऱ्हाड हातांत घेऊन पळणाऱ्या कुत्र्यावर त्यानं ती जोरान फेकून मारली—ती बरोबर कुत्र्याच्या मध्ये बसली. त्याची दोन भकलच झाली ! ! ओरडायलाहि त्याला अवसर मिळाला नाहीं ! त्याच्याबरोबरच त्याचा आवाजहि मध्येच तोडला गेला !...

भिवा त्याच्याकडं स्तिमित होऊन पाहातच राहिला ! !....

□ □ □

# नाग

आपल्याला चटकन् माणस ओळखता येतात अशी ज्याना घमेंड आहे, त्याना आमचे एक आव्हान आहे. ती समोरची, त्या हॉटेलात कौंटरजवळच्या खुर्चीत रेलून बसलेली व्याक्ति कशी आहे ते ओळखता? सागता? तसे सकाळ-सध्याकाळ ठराविक वेळेला ठराविक ठिकाणी होणारे त्याचे आगमन सर्वांना परिचित झालेले आहे. गोऱ्यापान आणि भरदार शरीरयष्टीचे बाबूराव रस्त्यान निघाले की, लोक टकमका पाहात राहतात. तलम आणि शुभ्र धोतराच्या चुण्या, रेशमी सैलशा शर्टाचा घोळ, त्यावरचे बुलनचें जाकीट, आणि उच्च काळी फरची टोपी, यानीं निर्माण केलेली ऐट लोकाना दिपवते. गोंडा लावलेली कापशीची चप्पल काहींहि कुरकुर न करता मऊसूतपणे रस्ता चालत असते. रंगलेल्या ओठाच्या कोपऱ्यातून निसटणारी

मिस्किलता आणि हाताच्या बोटातील हिऱ्याच्या आगठीचे तेज याचा मेळ साधलेला असतो. बाबूराव तुम्हाला गावात इतर कुठे फालतू लोकाप्रमाणे बसलेले दिसायचे नाहीत. रोज सध्याकाळी स्टॅडवरच्या हॉटेलात कौटरजवळच्या खुर्चीत रेललेले दिसतील. ते हॉटेल त्याच्या बाळपणच्या ओळखीच्या चादसाहेबाचे आहे. शेजारच्या सगळ्या हॉटेलमधून 'सिलोन' चा धिगाणा चालू असतो, पण चादसाहेबाच्या हॉटेलातील रेडिओ मोठ्या आदबीन सौम्य आवाजात एखादी रागदारी गात असतो. बाबुरावाच्या तिथल्या वास्तव्यान त्या हॉटेललाहि रुबाबदारपणा येतो, ऐट येते. पण त्यामुळच 'शॅव, चिवडा, भजी आनू च्या' घेणार स्टॅडवरच गावठी गिऱ्हाईक तिथ यायला बुजत.

आणि ठराविक वेळेला बाबूराव जायला उटतात. प्रत्येक कृतीतील एक प्रकारची ऐट, एक वेगळी ढब, त्यातील सवयीनं अगात बाणलेली अकृत्रिम अशी शिथिलता आणि ओठावरचा मिस्किलपणा, पाहणाराच्या मनात उगीचच त्याच्या मागून त्याच्या घरापर्यंत जाव अस कुतूहल निर्माण करतो. चोरटेपणान काही पोर घरापर्यंत येतातहि, पण बाबूराव घरात गेल्यावर दार थोडस ढकलून घेतात. तेहि घट्ट नव्हे. पण त्या किलकिलत्या दारातून पाहायची कुणाची छाती होत नाही. त्याचा रुबाबच असा आहे की, पाहणाराला स्वतःला उगीचच चोरट्यासारख वाटाव. समोरच्या हिरव्या माडीवरून ग्रामोफोनवर कुठल्या तरी गाण्याचे स्वर ऐकू येतात. तिथच बाबूरावाच वास्तव्य आहे. पाढऱ्या शुभ्र बैठकीवर रेलून बसलेल्या बाबूरावाकडे जाताना काही माणस उगीचच दबतात, बुजतात. आम्हा काही मुलाना मात्र तिथ केव्हाहि प्रवेश मिळतो. 'काका, काका,' म्हणून आम्ही भाबडेपणान विचारलेल्या प्रश्नाच्या अनुषगाने बाबूराव मग कितीतरी गमती सागतात. गोष्टी सागण्यामधला निश्चितपणा, टामपणा आणि थोडे थाबून बोलण्याची त्यांची शैली त्यातील अनुभवच मूर्तिमत उभा करते. त्यामुळे तिच्या खरेपणाबद्दल कुणाला शंकाहि येत नाही. बाबूरावाच्या बैठकीच्या खोलीचं वातावरणच अस असत कीं, इथ सगळ काही मनाला पटाव. गादीतक्याची, पाढरी शुभ्र बैठक मनातल्या शंकाकुशंका पुसून टाकते. मध्ये अंथरलेला गालिचा आणि दोन बाजूंना

मोजक्याच ठेवलेल्या दोन नक्षादार खुर्च्या तिथलं वैभव सागतात. वरचीं हड्याझुंबर त्या वैभवाला किनार जोडतात. खोलीचा रंग वातावरणात रग भरतो, आणि बैठकीजवळच पानाचा चकचकीत डबा रसिकाची वाट पाहात असतो.

जगात पान खूप लोक खातात! पण पान खावं बाबूरावानीच! चकचकीत पितळेच्या डब्यात देठ खुडून पान भरलेलीं असतात. झाकण उघडून पाहाव, पान पिकून पिवळी धमक झालेली असतात. त्यातच एक रसरशीत लिबू आणि तरतरीत केवड्याची पान असतात. चादीच्या डबीत कळीचा चुना लोण्यासारखा मऊ असतो, आणि त्यात केशर घातलेल असत. कागदासारखी कातरलेली सुपारी कप्पा भरून ठेवलेली असते. सुगधी कातवडी, लवगा, वेलदोडे, जायफळ, पत्री, खोबऱ्याचा कीस तुडुब भरून ठेवलेला असतो. एका वेगळ्याच डबीत अत्यत सुवासिक असा जर्दाहि भरून ठेवलेला तुम्हाला सापडेल. डब्यातला अडकित्ता इतका सुदर आहे की, मोठ्या माणसानाहि त्याच्याबरोबर खेळत बसाव अस वाटाव! इतकी सामग्री असल्यावर सन्याशालासुद्धा इथ पान खायची इच्छा झाल्यास नवल नाही. शिवाय बाबूरावाची पान खाण्याची पद्धतहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. डब्यातल पान घेतल्यावर ते पाढऱ्याशुभ्र फडक्यानं अगदी हळुवारपणान पुसतात. पानाच्या शिरासुद्धा ते किती नाजूक बोटानी काढतात. त्याची लाब ताबूस बोट पानाच्या पाठीवरून हळुवार फिरतात आणि पानाच्या शिरा अलगद बाजूला होतात. चुना नखलण्याची ढब, वेलदोडा तोडात फेकण्याची ढब आम्ही पाहाऽऽत बसतो—त्यानी असा तोड भरून साग्रसगीत विडा खाल्ला की, आम्हालाच पान खाल्ल्याचा आनद होतो!

बाबूराव जन्मले त्या वेळी काही त्याच्या तोडात चादीचा चमचा नव्हता! आता त्याची चाळिशी उलटून गेली आहे. पण त्याच सगळं आयुष्य अगदीं आरामात गेल आहे. त्याच्या बाळपणाचा आम्हाला पत्ता नाही. पण त्यांचं नतरचं सगळ आयुष्य सगळ्यानी जवळून ऐकलेलं आहे, पाहिलेलं आहे. माणसाच्या योगक्षेमाची जबाबदारी देवावर असते, अशी श्रद्धा पूर्वी फक्त सताची होती. आपल्याला त्याचा पडताळा कधींच येत नाहीं. पण हें

पटल्याची खूण बाबूरावांच्या चेहऱ्यावर सतत दिसते. त्याच्या चेहऱ्यावर तृप्ति ओसंडत असते. लोक त्याचा हेवा करतात. आत्तापर्यंत बाबूरावाच्या आयुष्यात कितीतरी स्थित्यंतर झाली आहेत. बाबूरावानी कीर्तन केली आहेत. गाण्याचे कार्यक्रम केले आहेत. सल्लागार म्हणून काम केली आहेत. ऐतिहासिक नाटकातून काम केलीं आहेत. तस पाहिल तर, एवढ्या मोठ्या आभाळाखाली त्याना सावलीच अस एखादंहि घर नाही. चार बोटाच्या तुकड्याएवढी जमीनहि नाही. शाळेतल चाकोरीतल शिक्षण नाही. भ्रमंती मात्र खूप झाली आहे, आणि अगदीं म्हातारी माणसहि सागतात की, बाबुराव अगदीं पहिल्यापासून असाच टुमदुमीत आहे ! म्हणूनच बाबूराव अगदीं एकटे आहेत. लग्नाचा वगैरे व्याप त्यानी वाढवला नाहींच. तस त्याच्या मनातहि कधी आल नाही. ऑफिसातल्या फायली, बॉस, एक तारीख, डायरी यासारख्या सामान्य माणसाच्या दैनदिन वस्तूपासून ते फार दूर आहेत—

सध्याचीं त्याची स्थिति अशीच आहे. सध्या ते एका कुटुबाचे पालक म्हणून वावरतात. एका लक्षाधीशाच्या मृत्यूनतर त्याच्या दोन मुलाच्या पालनाचीं जबाबदारी बाबूरावानी धावत येऊन स्वतःवर घेतली आहे. घरात माणसं तीनच : मुरली, लीला आणि स्वतः बाबूराव.

मुरली एक साधा, भाबडा जीव. त्याचा भाबडेपणा त्याच्या चेहऱ्यावर दिसतो. साधी मळकट विजार, लाब ढगल होणारा शर्ट, जुनी झालेली, पातेल्यासारखी बसणारी, फरची टोपी. बाहेर जाताना हातात एक पिशवी, बोलताना नाकातून, गडबडीत आणि हळू बोलतो. हा ' घरच ' पाहतो. त्यामुळे बाहेरची सगळी जबाबदारी बाबूरावावरच असते—

लीला इतर मुलीसारखी एक सामान्य मुलगी. रूपाच्या बाबतीत थोडासा परमेश्वराचा कानाडोळाच. पण स्त्रीसुलभ थोडासा नटवेपणा, थोडासा नखरा. हीं दोन्ही मुलं बाबूरावाना काका म्हणतात—पण हा कर्तृत्ववान् पालक स्वतःकडे कधींहि दुर्लक्ष करत नाहीं. स्वतःचे कपडे कोल्हापुराहून शिवून आणतो. इथलीं खेड्यातील शिलाई त्याला पसत पडत नाहीं ! बाहेर पडताना कानात अत्तराचा फाया असल्याशिवाय बाबूरावाना बरं

वाटत नाहीं. अधेमधे कोल्हापूर, पुणे, मुंबईच्या खेपा झाल्याशिवाय त्याना बरं वाटत नाही. ऐन तारुण्यातला त्याचा गाण्याचा षोक अजूनहि तरुण आहे. त्यासाठी वेगवेगळ्या चिजाच्या आणि तबल्याच्या रेकॉर्डस् सेवेला हजर आहेत. ग्रामोफोनवर तिरख्वॉंची तबल्याची गत चालू असली की, बाबूराव माडीवर तालाचा ठेका धरून नागासारखे डोलत असतात.

आयत्या कापसावर कोलाख्या मारणारी माणस समाजात थोडीं दबून असतात. परंतु बाबूरावाची स्थिति याच्या अगदी उलट आहे. ही सगळी इस्टेट माझीच आहे आणि मीच या मुलाना पोसतो आहे, अशा रुबाबात बाबुराव वागत असतात. साक्षात् रुबाबदारपणा म्हणजे बाबूराव ! आपल्यामुळ हे बसलेल घर उभ राहिल, अशी प्रचीति त्याच्या चेहऱ्यावर असते. पण बाबूराव तसा लाख माणूस. या मुलाचे तो कधीहि हाल करीत नाही. आता मुरलीला रुबाबान राहताच येत नाही—आणि तो जात्याच जरा बुजरा आहे—त्याला बाबूराव तरी काय करणार ? पण लीलाला फिरायला घेऊन जाण, सिनेमाला नेण, नवीन नवीन पातळं आणण या बाबतीत बाबूराव कजूषपणा कधीहि करीत नाहीत–पण यामुळ होत काय की, आजूबाजूचे लोक बाबूरावाबद्दल काहीतरी कुजबुजत असतात. त्यातल्या त्यात शेजारपाजारच्या बायकाना तर दुसरा उद्योगच नसतो. हाताला सारखे हेलपाटे देऊन, तस पाहिल तर चागल जोरान, त्या कुजबुजत असतात : "इऽऽश्य, काका म्हणायच आणि काय हे !" असली काही वाक्य पोरासोराच्यासुद्धा कानावर पडतात. स्त्री-पुरुषसबध ही गोष्टच मोठी विचित्र असते. वटवृक्षासारखी ! बी किती लहान; पण पसारा ? प्रत्यक्षाचा कित्येकदा काही सबधहि असत नाही. आणि बाबूरावाच्या वागण्यावरून तर काहीच सागता येणार नाही. कारण कुणाचहि काहीहि ऐकून बाबूरावानी आपल्या कार्यक्रमात कधीहि बदल केलेला नाही. लीलाला घेऊन फिरायला जाणं, सिनेमाला जाण यात कधीहि खड पडलेला नाही. खरा खरा गुन्हेगार माणूस रस्त्यान इतकी मान ताठ ठेवून चालूच शकत नाही. जेवण झाल्यावर "लिलेऽऽ, कपाटातली सुपारी आण बघू" म्हणून मारलेली खणखणीत साद कित्येकदा चागली लाबपर्यंत ऐकू येते ! काहीं वात्रट पोरे मुद्दाम काही सागतात— जाता–येता दारांत कधी दोघाची

गाठ पडली तर दोघेहि अंग चोरून घेत नाहीत. कित्येकदा चांगला धक्काहि लागतो. एकदा तर त्यांनी तिच्या पाठीवर चक्क हातच ठेवलेला पाहिला !––

अशा बाबतीत जगाची फार फसगत होते. पोरासोरांनी पाहिलेल्या आणि बालबुद्धीने अर्थ लावलेल्या गोष्टीत सत्य कितपत आहे, हे चटकन् सांगणं कठीण असतं. तसं पाहिलं तर वयानं बाबूराव लीलेच्या वडिलांबरोबरचे. ती त्यांना काका म्हणते; आणि फिरायला जाणं, सिनेमाला जाणं, एवढ्या-वरून लगेच हाच अर्थ सिद्ध होत नाही. शिवाय बाबूरावाच्या नेहमीच्या वागण्यात संकोच कधीहि दिसत नाही. आयुष्यातला विशिष्ट पैलू कच्चा असणारा माणूस त्या बाबतीत तरी कधी ना कधी संकोचल्याशिवाय राहणार नाही, आणि बाबूरावाचं वागणं किती रेखीव, चकचकीत. पराकोटीची रसिकता, नीति-अनीतीची सीमारेषा पुसून टाकणं शक्य असलं तरी रसिक मन इतकं निढावेल हे पटत नाही. जो माणूस रविशंकराच्या सतारीत इतका समरस होतो, तिरखवाँच्या तबल्यात नादलुब्ध होऊन डोलायला लागतो, हिराबाईंच्या गाण्यात सहृदयतेने गुंग होऊन जातो, –जो विडा-सुद्धा इतक्या रसिकतेने खातो, –तो इतका नीच होऊ शकेल ? इतकं कशाला, अगदी व्यावहारिक दृष्टीनं पाहिल्यावरहि बाबूरावाबद्दलच्या अफवा खोट्या ठरतील. ज्या माणसाला मूळचं काडीचेहि आर्थिक स्थैर्य नाही, तो ते प्राप्त झाल्यावर त्यामध्ये इतर कुठल्याहि मार्गाने अडचणी निर्माण करणे शक्य नाही. आपण बसलेल्या इमारतीतच माणूस सुरुंग लावण्यास धजणार नाही. अर्थात् या बाबतीत दुसऱ्या बाजूचाहि विचार करावा लागतो. परंतु पालकांकडे अशा नजरेनं आपणहून पाहण्याचा असा संस्कार आपल्याकडे तरी मुलीवर होत नाही, आणि महत्त्वाची गोष्ट ही की, असा माणूस केव्हा–ना–केव्हा तरी संकोचल्यासारखा, बुजल्यासारखा वागल्याशिवाय राहात नाही.

कदाचित् बाबूराव इतके निढावलेले असतीलहि. शक्याशक्यतेच्या मर्यादा काही माणसं उलथून टाकतात. परंतु ज्याच्या वागण्याच्या रेषा इतक्या सफाईदार, इतक्या गोलाईदार असतील तो माणूस खालच्या पातळीवर येईल ? आणि कुठल्याहि माणसाकडे पाहताना इतक्या खालच्या पातळीवरून पाहणें म्हणजे पाहणाराच्याच पातळीचा संशय यावा ! प्रत्यक्ष

जीवनात ' संशयकल्लोळा 'तील पात्राप्रमाणे पाहून चालत नाही. पाहणें बरोबरहि होणार नाही. मानवी मनाचा ठाव इतक्या लौकर लागत असता तर मानवी जीवनाची गणितं भराभर सुटलीं असतां ! परतु लोकाच्या शका बळावयाला आणखी एक कारण होत. लीलाच लग्न बरेच दिवस होत नव्हतं. लौकर लग्न न होणाऱ्या पण वयान वाढलेल्या मुलीच्या चेहऱ्यावर जो एक उदासपणा पसरलेला असतो, त्याचा थागपत्ताहि लीलेच्या चेहऱ्यावर नव्हता. त्यामुळे लोक वाटेल तितके कुतर्क करीत असत. ' असलेल्या सोयीची गैरसोय करायला बाबूराव काही खुळा नाही ' अस म्हणण्यापर्यंत लोकाची मजल जाते !

पण थोड्याच दिवसात आश्चर्य घडत आणि लीलाच लग्न होत ! आणि लोकाचे ठोकताळे कोसळतात ! पुन्हा प्रश्नचिन्ह समोर उभ राहत ! बाबूरावाबद्दल झटकन् मत देण मोठ अवघड होऊन जात.

पण समाजाच मन फार व्यापक असत. अवघड गोष्टी सवघड करून घेण्याची त्याची सवय फार पुरातन आहे. लीला अधूनमधून माहेरी येते. महिना-पधरा दिवस राहते. लग्नानतर मुलीच्या चेहऱ्यावर दिसणारी ' मानवल्याची ' छटा लीलेच्या मुखावरहि दिसते—पण अशा सुबत्तेच्या बळकट भितीतूनहि काही माणसाना भेगा दिसतात ! शेजार-पाजारच्या बायका कमाल करतात ! " लग्न झाल्यानतरहि जवळ काय हे ! नशीब त्या नवऱ्याच ! ! " अशा वाक्याची उद्गारचिन्ह त्याच्या चेहऱ्यावरून टिपून घ्यावीत !

पण हे खरोखरच खर असेल तर कीव कुणाची करायची ? त्या नवऱ्याची, की बाबूरावाची, की लीलेची ? हे जर खर असत तर ? तर......तुम्ही म्हणाल वडिलाऐवजी मुरली आहे ना ? पण तसा मुरली खबीर असता तर त्याला पालकाची जरुरी ती काय ? तसा तो लहानहि नाही. पण तो ' घरच ' पाहतो ना ! शेतीवाडी पाहण्यात त्याला इतर वेळ मिळतो कुठ ?

या साऱ्या तर्कांचा पाया बाबूराव. पण बाबूरावाचे लक्ष जगाकडे नाही. तितकी त्याना फुरसतहि नाही. किबहुना असल्या क्षुल्लक गोष्टींकडे लक्ष

ग्यायची त्याना संवय नाहीं. लीलाच्या मंगळागौरी थाटांत पार पडतात. माहेरपणात तिची चंगळ होते—

पण लीला काहीं कायमची इथं राहात नाही—त्यामुळे या सगळ्या तर्ककुतर्कोतून बाबूराव वेगळेच राहतात. उलट पोरीच लग्न लावून दिलं, आता तर मुरलीच्या दोन हाताचे चार हात करून दिले कीं, आपण सुटलो या आविर्भावात बाबूराव अजूनहि गावात वजन ठेवून आहेत.

आणि खरोखरच एक दिवस मुरलीच लग्न ठरत ! मुरलीच लग्न ठरत आणि बाबूरावाभोवतीच धुक विरत. विनाकारण नको तिथ शिरणाऱ्या लोकाच्या नजराहि सरळ झाल्या. केल्यासवरल्यानंतर भ्रमतीसाठी बाहेर पडणाऱ्या एखाद्या विरक्त आत्म्याप्रमाणे लोक त्याच्याकडे पाहू लागले. एक पार बसलेल घर उभ करून देऊन पुढची वाट चालायला लागावं, अशा वृत्तीन बाबूरावहि वागूं लागले. या पोरक्या पोराचे हाल होऊ नयेत, त्याना काही कमी पडू नये म्हणून बाबूरावानी सर्व हौस पुरवण्याची तयारी केली. मुरलीच लग्न अगदीं थाटात पार पडलं पाहिजे याबद्दल बाबूराव अगदी जातीन काळजी घेत होते. नेहमी सथ वागणारे बाबूराव लग्नाच्या तयारीची धावपळ स्वतः करीत होते. कशातहि न्यून राहिलेलं त्याना खपत नव्हत.

आणि ठरल्याप्रमाणे मुलीच्या दारात मुरलीच लग्न बॅडवाजन्त्र्याच्या जोशात, थाटमाटान, पार पडल. सूप वाजल आणि डाव्या पायान उंबरठ्यावरच्च माप ओलाडून नववधू मुरलीच्या घरी आली. पिवळ्या-पिवळ्या पावलानी तिन मुरलीच घर भरून टाकल. तिच्या रूपाच्या, गुणाच्या आणि नव्या नवलाईच्या कौतुकानी वातावरण ओसंडून गेल. नव्या नवलाईच्या या कौतुकाला सुमार राहिला नाही. पचपक्वान्नाच्या पक्ती उठल्या. धार्मिक विधींनी वातावरण दुमदुमून गेल. फिरून गाव दाखवण झाल, चहाचीं निमत्रण झालीं. गावच्या थिएटरमधला म्हणून कुतूहलाचा सिनेमा झाला. बाबूरावानीं काहीहि कमी केल नाही. पण सिनेमालाहि नववधूबरोबर बाबूरावानाच पाहून लोकानी त्याना कुत्सितपणानीं विचारलच —पण बाबूरावानी सरळ सरळ उत्तर दिल—

" मुरली लाजतो ! बाहेरच पडत नाहीं। मुलींच्या मनाचा नाहींतर हिरमोड होतो. मग तिची हौस तर केली पाहिजे..."

आणि पहिल्या पाच दिवसानंतरच ती नववधू आपल्या माहेरी गेली.

आणि त्याच रात्री तिने आपल्या आईच्या गळ्याला मिठी मारून हंबरडा फोडला !

आणि सांगितलं, " आई, मला आणखी काय वाटेल ते करायला सांग. पण पुन्हा सासरी जायला सांगू नकोस ! ! "

□ □ □

# टंब्या !

सकाळी रोजच्या वेळेला मी जागा झालो. पण अथरुणात तसच थोडा वेळ पडून राहाव अस वाटल. अगाचा मुटकुळा करून पाघरुण अगावर ओढल. थोड्या वेळान आज रविवार आहे हे लक्षात आल. आज शाळेला जायच नाही, काही नाही. खूप झोपायच ! आजी भूपाळी म्हणत होती. तिचा आवाज गोड आहे. ती सावकाश म्हणत होती,

" उठी गोपाळजी जाई धेनूकडे "

पाहती सौंगडी वाट तुझी..."

आणि काहीतरी काहीतरी...

थोड्या वेळानं नली उठून तोड धुवायला गेली. दादा चहा जास्त द्यायला पाहिजे म्हणून आईजवळ हट्ट करीत होता. मामी चहा करत होती. ' स्टो 'चा आवाज

कानावर येत होता. एका अगावर पडून तो ऐकावासा वाटत होता. फार वेळ ऐकून कान गच्च झाले......

तोपर्यंत आई म्हणाली, " बाळ्या, ऊठ लवकर. साडे सात वाजले. "

ह ऽऽ म्हणून मी अंथरुणातल्या अथरुणात आळस दिला, आणि तसाच पडून राहिलो. तवर आई आत आली. म्हणाली, " ऊठ रे लवकर. मामा येईल आत्ता चहाला. अथरुण काढायची आहेत मला. ऊठ. "

मी अथरुणावर उभा राहिलो. बेबी कुरवाळीत एक जाभाई दिली. सदरा घातला. तोड धुवायला गेलो. तिथ नली उभी होती. हड्यातल गार पाणी घेऊन नलीच्या अगावर उडवल, अन् मी आईजवळ पळून आलो. नली ओरडली, " का रे उगीचच्या उगीच ? सुरू झाल वाटत तुझ आत्ता-पासन ? आई ऽ...... "

तवर मामा आला. सगळी गप्प बसली. मी नलीला वेडावून दाखवल. चहा घेतला. दादान चहासाठी चोरून हट्ट केला. तो हट्ट करतो, आणि मार खातो, म्हणून मी कधीच हट्ट करत नाही. तवर ' बाळू ' म्हणून बाहेरून हाक आली. गोटखिडे आला होता. काल मीच त्याला सागितल होत. उद्या रविवार आहे. सकाळी आमच्या घरी ये. म्हणजे आपण गोट्या खेळू. मी बाहेर आलो. त्याला म्हटल, " आलास व्होय रे ? थाब ह. आत्ता येतो. " मामाने 'गोटाखिडेला हाक मारली. त्याला विचारल, " कुठल्या इयत्तेत आहेस रे ? " तो म्हणाला " पहिलीत. " " आमच्या टब्याला काही येत का रे वर्गात ? " तेव्हा तो म्हणाला, " काल देशपाडे मास्तर वर्गावर आले होते. त्यानी शब्द सागितले. बाळू पाटी दाखवायला गेल्यावर ते म्हणाले की, तुझा थोरला भाऊ किती हुशार आहे, आणि तू कसारे इतका लड्डुया ? "

सगळेजण हसायला लागले. का हसले मला काही कळले नाही. ' लड्डुया म्हणजे काय बर ? ' हा, जि हा ! लाडवाशी काहीतरी सबध असावा त्याचा. आणि मला लाडू आवडतात ! म्हणूनच सगळेजण हसले ! हा, हा,......

" मामानं सांगितलं, तासाभरान पोहायला जायच ह सगळ्यांनी. टब्या येणार न ?" मीं एकदम म्हटल. " हो, हो ! " मामा मला टंब्या म्हणतो.

घरात सगळी बाळ्या म्हणतात. दादाला आम्ही केव्हा केव्हा भोपळा म्हणतो, मग तो चिडतो ! माझं नाव शरद आहे हे मला माहीतच नव्हते. पहिल्यादा मामाबरोबर शाळेत गेल्यावर मास्तरानी माझे नाव विचारले. मामाने सागितले ‘ शरद.’ मग मला कळलं, माझ नाव शरद आहे. माग एकदा नली मला म्हणाली होती की, तुझ नाव शरद आहे म्हणून. मला खोटच वाटल होतं....

महादेवाच्या देवळाकडे ‘ गद ’ चागली आहे. म्हणून गोटाखिडेला घेऊन तिकडे गेलो. नवराबायकोन खेळलो. मी गट्ट्या खडाखड टिपतो ! त्याला बायको करून खूप वेळ ‘ पुगिवल’ ! तो रडकुडीला आला. मग खेळ बस केला. त्याला सागितल, “ तू जा आता. आज आम्ही पोहायला जाणार आहो. तू येणार ? ”

“ नाही बाबा, आमची आई लावून देत नाहीं. ” तो म्हणाला. बरं म्हणून गोट्या खिशात टाकून घराकड पळत आलो. सगळ्याची तयारी झाली होती. पोहायला जायच म्हणून मला फार आनद झाला होता. पाण्यावर अतराळी हिडायचं ! दमलो की पाय टेकायचे...खूप खूप मजा ...जाता जाता कुणाला तरी चिमटा घ्यावा अशी इच्छा झाली. कुणाला घ्यावा बर ! दादा लगेच चिडतो. तो मारील. आशाच नाव नाही बाबा काढायच. तो माझ्या उरावर बसतो. नलीला घ्यावा चिमटा. पळून जायच. मी काही तिला सापडत नाहीं, काही नाही. मग हळूच तिच्या मागे गेलो. नलीजवळ आशा उभा राहिला होता. तिला ‘ किच ’ करून चिमटा घेऊन पळालो. नली किचाळली. तिन आईला सागितल. आई मला मारायला आली. मी सागितलं आशान चिमटा घेतला. आशा सगळ्यात जास्त दगा करतो म्हणून केव्हाहि त्याला मार बसतो. मग मी कधी कधी दगा करतो आणि त्याचे नाव सागतो. आई त्यालाच मारते ! माझ नाव कुण्णाला कळत नाही......

सगळेजण विहिरीवर पोहोचलो. प्रथम दादाला भोपळा बाधला आणि मामानं त्याला पाण्यात नेल. त्याबरोबर दादा ‘ मी नाही, मी नाही’, म्हणून ओरडायला लागला. तेव्हा मामान त्याला पाण्यात फेकून दिला ! दादा खच्चून बोबलला ! ! विहिरीतली माणसं हसायला लागली. मीं

मनात ठरविलं त्याच्यासारखं आपण भ्यायच नाहीं. आणि दमलो कीं पाय टेकायचे. गोटखिंडेनं मला एकदा सागितल होत की, विहिरींत गुडघ्याइतकं पाणी असतं म्हणून. मग काय ?...

मला भोपळा बाधला. पाण्याजवळ जाई तशी मला भीति वाटू लागली. मामान मला एकदम उचलल आणि पाण्यावर ठेवल. माझ्या छातीवर राक्षस बसल्यासारखा वाटला. दात घट्ट बसले. सगळीकडं पाणीच पाणी दिसायला लागल. मी पाय टेकायला बघितल, पण पाय टेकेनात. नाकात पाणी गेलं. मग मलाहि बोबलावस वाटल. पण लोक हसतील म्हणून नुसता खच्चून ओरडलो......

घरी आल्यावर फार भूक लागली. दादा पोहताना भ्याला म्हणून त्याची सगळे चेष्टा करीत होते, म्हणून तो चिडला होता. तो जेवायलाच उठेना. आई म्हणाली, " भोपळा आज फुगलाय ! "

मी म्हटलं, " जास्त फुगल्यावर फुटेल आणि बिया बाहेर येतील. " मग तो मला मारायला धावला. मी आजीकड पळालो. ती स्वयपाक करीत होती. म्हणून ती माझ्यावर खेकसली, " कार्ट्या शिवशील की मला. बाळ्या, अलीकड तू फार दगा करतोस ह. "

" मग पलीकड कोण आहे आज्जी ? " मी म्हणालो. सगळेजण हसायला लागले. दादा मला मारायला लागला. तवर मामा आला. मग तो गप्प बसला. मी त्याला मान वाकडी करून वेडावून दाखविल. कशी जिरली !...

मामाला सगळेजण भितात. सगळ्याना मारतो तो. मला कधी मारीत नाही. पण केव्हा तरी दगा केला की, जोरात गालगुच्चा घेतो. कित्ती वेळ गाल दुखतो मग !

जेवण झाल्यावर सदरा घालत घालत सोप्याला आलो. मामा खुर्चीवर बसला होता. थोड्या वेळान मामी बाहेर आली. तिन सुपारीची चिमूट मामाच्या हातावर ठेवली. मामान तिचा हातच धरला ! ' इश्य, काय हे ' अस म्हणून मामी रागावल्यासारखे करीत मामाकडे बघू लागली. मी जीभ गालात फिरवीत इकडे तिकडे बघूं लागलो. मामा हसत हसत माडीवर गेला. मामा वाईट आहे. मामीला मारणार होता वाटत !

चड्डीच्या खिशात हात घालून मी तसाच उभा राहिलो. मामीच्या हातातल्या डब्यातील सुपारी किती खमग असते ! म्हणून मी तिला म्हटलं,

" मला दे की मामी सुपारी."

मामी म्हणाली, " मुलानी सुपारी खायची नसते. "

' बर ' म्हणून मी तसाच तिच्याकडे बघत उभा राहिलो.. मग तिने मला जवळ बोलावले आणि म्हटले, " आत्ता फक्त देते. पुन्हा नाही ह मिळायची तुम्हाला." अस म्हणून तिन माझा एक मुका घेतला. सुपारी खात खात मी ' बर ' म्हणून मान हालविली. मामीचा ओठ किती मऊ आहे. मामी गोरीपान आहे, माझा मुका घेते, आणि मला अहोजाहो बोलावते. म्हणून ती मला फार आवडते. माझ्याहून ती एवढी मोठी असून मला ' अहोजाहो ' कस म्हणते ?... थोडा वेळ मामाच्या खुर्चीवर बसलो. त्याच्यासारखे पाय हालवले. हातात वर्तमानपत्र घेतल. हात वर धरून वाचल्यासारख केल. मग हात दुखायला लागला म्हणून खाली टाकून दिल. तवर नली, आशा बाहेर आले. त्याच्याबरोबर खेळायला गेलो. शेजारचा रमेश, अलकासुद्धा आली. ' कशान खेळायच रे ? दगड–माती.—'

नलीवर डाव आला. ती मला शिवायला आली. मी पळूनच गेलो. मी तिला सापडतोय थोडाच ! ती आशाला शिवायला गेली. आशा खच्चून पळाला. त्याचा धक्का लागून मी पडलो. मला केवढ्यादा लागल ! मला रडू आल ! कारे आशड्या, मला पाडलंस ? तो म्हणाला, " मी काय तुला मुद्दाम पाडलं काय ? " मी आशड फाशड म्हणून घरात पळालो......

आई शेजारच्या गोपाळच्या घरी बसायला निघाली होती. मी म्हणालो, ' मी येणार ! ' "तिथ दंगा करायचा नाही. रडायच नाहीं." मी मान हालवली. तिच्याबरोबर उड्या मारीत गोपाळच्या घरी गेलो. गोपाळला घेऊन त्याच्या परसांत गेलो. गोपाळ अशक्त आहे. चालतांना त्याच्या गुडघ्याला गुडघा थटतो. माझ्याहून तो मोठा आहे, पण मी त्याला पाडीन. चालताना तो गाणे म्हणत होता,

" तुज स्वप्नी पाहिले रे गोपाळा. "

मीहि गाण म्हटल, " गोपाळचे स्वप्न मी पाहिले. "

तेच तेच पुन्हा म्हटलं. मग मी व गोपाळन आडात हळूच वाकून बघितलं. आडाजवळ गुलाबाच झाड आहे. त्याच्याखालची ओली माती घेऊन आम्ही चिमणीचा किल्ला केला. मग कटाळा आला......तवर नली मला सागत आली, " अरे बाळ्या, तुझ्या सगळ्या गोट्या आशान आडात टाकून दिल्या ! "

" खर ? '

" आग्दी खर ? "

मला आशाचा राग आला. त्याला काय कराव. मला तो ऐकतच नाही. किती गोट्या जमविल्या होत्या मी. थाब आईलाच सागतो. मला रडावसं वाटल. म्हणून मी आईकडे आलो न् तिला म्हणालो ' ए आई, चल की घरी. ' ती म्हणाली, ' थाब जरा. ' मला जास्तच रड यायला लागल. म्हणून तिचा हात ओढून म्हणालो, ' चल की आई घरी. आमाला रडायच आहे ! ' गोपाळच्या घरातील सगळी माणस हसायला लागली. मला त्याचा रागच आला. हसायला काय झाल ?...मग आई म्हणाली, 'तू जा.'

मी पळत घरी आलो. माजघरच्या कोनाड्यात माझा गट्ट्याचा डबा होता. मी तो काढला. त्यात तर गट्ट्या होत्या. मोजून बघितल्या. बरोबर तेरा आहेत ! हाड्तिच्या ! नलीनं खोटच सागितल ! नलिटली कुठली. मी इकड-तिकड बघितल. पण ती कुठ नव्हतीच. मी मनातल्या मनात ' निनू मसाणी ' म्हणून तिला शिवी दिली. मला माहीत आहे मामा कधी कधी तिला ' निनू मसाणी, ' म्हणतो. शिवीच आहे ती.

सोप्याला, माजघरात कुणीच नव्हत. स्वयपाकघरात गेलो. आजी एकटी बसून शेगदाण्याचा लाडू खात होती. मी तिला म्हटल, " एकटी काय ग खातेस आज्जी ? " "तू आलास का कार्ट्या," म्हणून तिन माझ्या पाठीत गुद्दा घातला. मी रडायच सोग करून बाहेर निघालो. तेव्हा आजीनं मला आंत बोलावून एक लाडू दिला. मग आजीची मला माया आली. ती मला केव्हां तरी मारते, पण सगळ्यापेक्षा जास्त खायला देते.

आणि मारलं तरी तिचा हात लागत नाही. म्हणून मला तिची माया येते. चिकट हात शर्टाला पुसत पुसत बाहेर आलो. खेळायची पाकिटं मीं माडीवरच्या कोनाड्यात ठेवली होती. ती आणून कुमारकडे खेळायला जाव म्हणून मी माडीवर गेलो. मी मामाच्या खोलीत वाकून बघितले. मामा मामी कॅरम खेळत होते. मामा केवढ्यादा हसत होता. मामींनं ताबडी सोंगटी घेतली. ती म्हणाली, " बघा, क्वीन माझी आहे की नाही ते. " आणि ती जोरान हसायला लागली. " ही आहे की माझी क्वीन ! मला लाकडी काय करायची ! " अस म्हणून मामान तिचा एकदम मुका घेतला ! ! मला गम्मतच वाटली ! ! मामी म्हणाली, " इश्य, मुल येतात बर का वर खेळता खेळता ! "

मामा म्हणाला, " मग ! येईनात ! "

मीं तोंडावर हात दाबून धरून तसाच खाली पळत आलो. ही गम्मत कुणाला तरी केव्हा एकदा सांगेन अस मला झाल होत. दादा भय्याच्यात अभ्यासाला गेला होता. आशा घरात नव्हताच. हा, नली होती गोपाळच्यात मघाशी ! मी पळतच गोपाळच्यात गेलो. दारातच नली माजरीच्या पिल्लाबरोबर एकटीच खेळत होती. धापा टाकीत मी म्हणालो,

" अग नले ! मामान मामीचा मुक्का घेतला ! ! "

तेव्हा नली झग्याच एक टोक हातात धरून माग ओढीत म्हणाली,

" एऽऽ आपण म्हणूं नये तस ! खुळचटच आहेस ! "

मी रागान म्हणालो, " का ग नलिटले, तूच खुळी आहेस. "

मग मी घरी आलो. भाडभर पाणी प्यालो. आजीबरोबर मी आणि नली देवळात पुराणाला गेलो. जाताना वाटेत आमच्या बाई भेटल्या. मी नलीला म्हटल, " नले, त्या बघ आमच्या बाई ! "

नली म्हणाली, " तुमच्या बाई घाणेरड्या आहेत. माजरासारख्या डोळ्याच्या ! आमच्या दिवाणबाई कशा छान आहेत ! "

" नाहीच. आमच्याच छान आहेत. तुझ्या बाई काळ्या काळ्या मिट्ट ! "

देवळात गेल्यावर मी आणि नली आजीजवळ बसलो. गुरुजी पुराण सांगत होते. कित्ती बायका आल्या होत्या ! मी शर्टाचं टोक तोंडांत धरून

गुडघ्यावर उभा राहिलो. एक हात खालीं टेकून, भुईवर डोक टेकून मागं बघितल. गुरुजी उलटे बसलेले दिसले ! वरच्या घटा दिसल्या ! आजीनं मला दाबल, " नीट बैस रे. "

मग मी देवासारखा बसलो. नली माडी घालून, तळहात हनुवटीखालीं देऊन, कोपर उजव्या मांडीवर टेकून, कळत असल्यासारख, लक्ष देऊन ऐकत होती. मग माझी मान दुखायला लागली. गुरुजींच्या पोथींपुढे पिवळेधमक केळं ठेवले होते. तिकडे माझे लक्ष गेले. ते खावेसे वाटले. पण परवा आजीने सागितल होत, " देवापुढच्या वस्तु आपण खायच्या नसतात. आपण देवाला द्यायच्या असतात. " देव आपल्याकडून घेऊन खातो. म्हणजे तो गरीब असावा ! आरती सपल्यावर खिरापत घेऊन आम्ही अधारातून घरी आलो...

मामीन स्वयपाक केला होता. दाबून जेवलो. जेवण झाल्यावर मामा आम्हा सगळ्याना म्हणाला, " वाचत बसा रे. लगेच झोपू नका." मग तो माडीवर गेला. मी पाटी घेऊन उद्याचा उतारा काढला. मग पुस्तक पुढं धरून बसलो. झोप फार आली होती. थोड्या वेळात एक एक अक्षर दोन दोन दिसायला लागले. पेंग यायला लागला. पुस्तक तसच धरून आडवा झालो...मग आईनं मला उचलून आपल्या अथरुणावर नेल. सगळ्यापेक्षा मला आईजवळ झोपण फार आवडत. म्हणून मी तिच्या कुशीत शिरून डोळे घट्ट मिटून घेतले.

□ □ □

# कणा

लहानपणापासून मी गजाला पाहतो आहे. तो आहे तस्सा आहे. काळाचा ओघ बदलत असतो. काही वेळेला माणसेहि बदलल्यासारखी वाटतात. पण गजा बदललेला नाही. तसे त्याचे वयहि काही फार नाही. अजून त्याची चाळिशी उलटलेली नाही. पण गजाचे आयुष्य आता खरोखरच ठरून गेले आहे.

परवा माझ्या एका मित्राने मला सांगितले की, कणा नसलेला एक माणूस त्याच्या पाहण्यात आला. तसे पाहिले तर जगात अशीच माणसे फार आहेत. प्रपंच करणाऱ्या प्रत्येक माणसाला आपल्या पाठीतील कण्याला सांधे आहेत याची जाणीव लौकरच होत असते. गजाननच्या पाठीत सांधे नसलेला, टणक, पोलादी कणा आहे; आणि त्यामुळेच त्याचे बालपण अभ्यास न करताच टिवल्याबावल्या करीत, नाटकात कामं

करीत, कटाव म्हणत म्हणतच सपलेले आहे. आणि आता तो तरुण आहे, पण मला नेहमीं असे वाटते की, हा म्हातारा होणारच नाही.

आयुष्यात आपणाला शिक्षण घेता आले नाही म्हणून गजाला कधीहि वाईट वाटलेले नाही. बरोबरीचे मित्र कॉलेजला जाऊन पदवीपर्यंत पोहोचले तरी गजानन डगमगला नाही. स्वतःच्या वडिलाचे समाधान करण्याची, त्याची समजूत घालण्याची हातोटी त्याला पहिल्यापासून जमलेली आहे. पोर शिकली तरी त्याना नोकऱ्या कुठे वाढून ठेवल्या आहेत? शिक्षण घ्यायचे म्हणजे आयुष्यात नोकरीचा जुगार खेळण्यासारखेच आहे. तसाच मीहि धद्यात कसोटी पाहतो, असे गजाननचे प्रामाणिक म्हणणे. त्यासाठी आपल्याला पैसे द्यावेत असे वडिलाना पटवून देण्याचे कसब फक्त गजाननलाच साधलेले आहे. आणि पटवून घेणारे वडीलहि त्याला लाभलेले आहेत, ही त्याच्या भाग्याची गोष्ट आहे. त्यामुळे कळायला लागायच्या वयातच वीस हजार रुपये त्याच्या हातात खेळू लागले. आता पैसेच खेळू लागले तर गजाननने तरी गप्प कसे बसायचे? कुठला व्यवसाय करायचा हे चटकन् ठरले. पैसा असला की कुठलीहि गोष्ट लगेच ठरविता येते. गजाने खेळणी तयार करण्याचा कारखाना काढला. एकेका चादीच्या नाण्याने कारखान्याचा एकेक खाब उभा राहिला. कामासाठी पुण्या-मुबईच्या खेपा व्हायच्या. मुबईच्या खेपात गजाननचा मुक्काम अताकडे.

अता आमचा बाळमित्र. दोघे भाऊ भाऊ नोकरीसाठी मुबईला गेलेले. पहिल्याच मुक्कामादिवशी रात्री गजाचा दोघाना गभीर प्रश्न—"नोकऱ्या करून या दहा वर्षांत तुम्ही शिल्लक किती टाकलीत?" उत्तर काय येणार हे अपेक्षितच होते. त्यामुळे गजाला चेव यायचा. "अरे, अगाची कातडी जाईपर्यंत राबताय इथे येऊन! गाव सोडून येऊन पोटच भरताय न नुसती? मग ती एवढी लाचारीन, हाजीहाजी करीत, हे पळापळीच जीवन जगून का? चला माझ्याबरोबर. कारखाना काढलाय मीं. बडोपंत, तुम्हाला तीनशे रुपये पगार! अता, तुला अडीचशे! रुबाबात न्हावा चला. गादीवर बसून, तक्क्याला टेकून पगार घ्या..."

सामान्य माणसाला पैशाचा मोह चटकन् पडतो. प्रसगीं माणसाला सारासार विचार राहात नाही. मुबईहून दोन जीव विजेवर पळणाऱ्या

गाडीतून धावत पुण्याला आले. नोकऱ्याचा राजिनामा देऊन आले. पुण्याहून कराडला उतरले. स्टेशनवरच कारखाना समोर उभा. जोराने पळणारा. आणि हे दोन अनुभवी मॅनेजर आल्यावर तर त्याची चाके ऊर फाटेपर्यंत पळू लागली. रोज सध्याकाळी गल्ल्याचा ढीग पडू लागला. तुफान मजा होऊ लागली. चमचमीत जेवण, दोस्ताना घेऊन प्रभात टॉकीजला सिनेमा ! तीन खुर्च्यांवर पाय फाकून गजानन मध्ये बसायचा ! बंदुकीच्या गोळ्या मारल्यासारख्या पिचकाऱ्या मारीत. मध्ये कुणाचे पागोटे आले तर टप्पल मारून उडवून द्यायचा आणि म्हणायचा, "पावणं, पैसे देऊन तुमच वाटोळं पागोट पाहायला आलोय काय ?" —आणि या व्हॅग दि मिलरला उलट बोलायची कुणाची टाप लागलीय !

आणि मग सिनेमा सुटल्यावर सगळ्याना हाकलून गजानन आपल्या साळूकडे जात असे. मित्रमंडळी कधीमधी गांभीर्याने त्याला उपदेश करायचा प्रयत्न करीत,

"या वयात काय हे गजाभाऊ ?—त्यापेक्षा लग्न का करीत नाही ?"

"तुम्हा लग्न केलेल्या लोकाचे लग्नाबद्दलचे अनुभव सागा न ! पोराच लेंढार आणि टाळक्यावर जबाबदाऱ्याच्या गोणी ! बाबानो, लग्नापेक्षा ठेवलेली बरी ! रोज ती माझ अग तेल लावून रगडते. आपुलकीन अधन-मधन चमचमीत खायला घालते. माझ्यावर जीव लावते. सागा बर, यापेक्षां तुमच्या बायका जास्त काय करतात ?"

साळूच्या रूपाबद्दल कित्येकदा त्याला विचारणा केली जाते. त्या वेळी तो म्हणतो, "ती काही तशी कुरूप नाही. पण माझ्या मते रूपाचा तितकासा प्रश्नच निर्माण होत नाही ! नाही तरी मनापासून मला जपणार या जगात कोण आहे ? शिवाय उद्या ती अविश्वासान वागायला लागली तर लाथ मारून हाकलून दीन ! तसा गहिवरत बसणारा मी नाही !"

जवळचा पैसा कसा नकळत संपत असतो हें जगात कुणालाच कळलेलें नाही. माणसाच्या जवळचा पैसा म्हणजे धोतरात पाणी ! गजानन तरी त्याला काय करणार ? सहा महिन्यात कारखान्याला बसल्याजागी घेरी आली आणि दोन मित्र उघडे पडले ! त्यावर गजाननचे उद्‌गार—

"पाढऱ्या पायाचे लेकों, जावा परत मुंबईला. तुमच्या नशिबातच गादीवर बसायच नाही ! मी तरी काय करणार ?"

गाभीर्याने जीवनाकडे पाहणाऱ्या त्या दोन मित्राना खरोखरच भोवळ आली. अशा वेळी त्याना परत गेल्यावर मुबई फारच अफाट वाटली. पण जत्रेतल्या चक्राकडे पाहावे तसे गजाननने त्याच्याकडे पाहिले—

सगळी आवराआवर करून गजानन गावी आला. तोहि मजेत. काहीच झाले नाही अशा थाटात ! घरात माणसें सतरा. मिळवणारे कोणी नाही. शिक्षण दिले पाहिजे अशीं धाकटी भावडे. लग्नाला आलेल्या दोन बहिणी. वय झालेले आईवडील. सगळ्या गोष्टी घरात तयार. पण काळजी करायची गजाननला संवयच नव्हती. दोऱ्या सैल झालेल्या अगणातल्या बाजल्यावर त्याला गाढ झोप लागे, आणि इकडची कितीहि आवराआवर केली तरी कारखानाच तो. देणी शिल्लकच राहिली. दहा-पाच हजाराचे कर्ज म्हणजे गजाननला सुपारी कातरल्यासारखे ! पण देणेकऱ्याच्या तगाद्याचे पाय गावापर्यंत पोहोचले.

सावकाराला कविता लिहून पाठवणारे कूळ कुणी पाहिले आहे ? गजानन प्रतिभावत् आहे. कविताची पुडकीच्या पुडकी त्याने आम्हाला दाखवली आहेत. तीहि देणेदारासाठी लिहिलेली. नाही तर पाढऱ्यावर काळे करायला त्याला मोकळा वेळ असतो कुठे ? पण रकमेचा हप्ता पाठविण्याच्या ऐवजी कविता पाठविण्याचे धाडस गजाने केले आहे ! कारण त्याशिवाय त्याला करता येण्यासारखे काही नव्हतेच. त्यानंतरहि त्यानें अनेक व्यवसायाचे खेळ केले, पण त्यातहि कुणाचे तरी पाढरे पायच्च आडवे आले ! आणि देणी वाढली.

आणि गजाने घर सोडले. त्याने घर सोडले आणि मुबई गाठली. कारण सगळ्याची कल्पना अशी आहे की, मुबईत माणसे मरत नाहीत. लहानपणातील नाद वेठीवर धरला आणि गजानन कीर्तने करूं लागला. लाब अंगरखा घालून, रुमाल बाधून, अंगावर उपरणें घेऊत उभे राहायचे एवढेच त्याला माहीत होते. विशिष्ट कपड्यामध्यें असे काही सामर्थ्य असते की काय कुणास ठाऊक, पण ते अंगावर घालून उभे राहिले कीं, पुढचे सुचत जाते. डोक्यात कथाचे भाडार होतेच. हातात झाज घेतली आणि

गजानन कीर्तनकार झाला ! केळेवाडीच्या राममदिरात त्याचीं कीर्तने रगू लागलीं. पूर्वरगात माणसाच्या फासळ्याना व्यायाम मिळू लागला. कीर्तनाला गर्दी होऊ लागली. तबक लक्ष्मीने भरू लागले. कारण आपल्याकडे श्रद्धावान् माणसाना तोटा नाही. पोरासोरापासून म्हाताऱ्याकोताऱ्या-पर्यंत आणि बायाबापड्यापासून पोरीबाळीपर्यंत सर्वांची दाटी होऊं लागली......

कुणाला कुठली वस्तु जगात आवडेल याचा काही नियम नाही. आई-बरोबर नियमाने कीर्तनाला येणाऱ्या एका भाबड्या मुलीला आमचा हा बुवाच आवडला ! अगदी मनापासून आवडला ! कुणाच्या मनाला दुखवायचे नाही म्हणून तिच्या मनासारखे करून टाकण्यासाठी गजाननने तिच्याशी लग्न करून टाकले ! मुलीला बाप नाही, आईची इस्टेट बरी आहे आणि मुलगी स्वतः सरकारी नोकर आहे मुलाचा तपशील वधूपक्षाला लागत नाही. अशा तऱ्हेने गजाचे लग्न झाले आणि त्याचा ससार सुरू झाला. बायकोने मिळवून आणलेले खाताना कमीपणा वाटणारा कमकुवत मनाचा गजानन नाही. मात्र घरी सतार आली म्हणून हातातली झाज बंद झाली.

नवऱ्यापासून गजाननच्या बायकोच्या काही अपेक्षा होत्या. त्याने कामधदा काही केला नाही तरी चालेल. फक्त तिचे म्हणणे त्याने वेळच्या वेळेला कपडे बदलावेत. अधूनमधून का होईना, पण डोक्याला तेल लावावे; आणि सकाळी उठल्याबरोबर तोडातला पानतबाखू थुकून चहा प्यावा ! पण गजा सगळ्याची धोरणे ओळखतो. हा आपला नवरा असे चार बायकात सागताना सकोच वाटू नये यासाठीच तिची ही धडपड चालली आहे, हे ओळखायला त्याला वेळ लागला नाही

" ए, तूं मिळवतेस म्हणून लगेच माझ्या तोंडात लगाम घालायला बघूं नकोस. नाही तर मी आपला चालली बघ गावाकड. मी काही केवळ तुझ्या जिवावर जगत नाही. शेतीवाडी आहे माझी— "

" तसं नाही, पण जरा बर दिसेल अस वागाव म्हणते मी. तुम्हीं काहीं काम करीत नाहीं याबद्दल चकार शब्द तरी काढलाय का मीं ? "

" हा, तोंड फार सुटायला लागलय. पतिव्रतानी नवऱ्याशीं कसं बोलावं हें माझ्या कीर्तनातलं इतक्यात विसरलीस काय ? "

लग्नाबद्दलचे मत नुक्ते लग्न झालेल्या लोकाना विचारू नये ! त्यामुळे गजाननच्या बायकोला गजाननबद्दल काय वाटते हे सागणे अवघड आहे. तो मात्र अधूनमधून गावी येतो. शेती करतो. शिगमोडका बैल, केवळ चाकेच असलेली गाडी, आणि गावातल्या लोकाचे नागर-औत घेऊन शेती करतो !

त्या वेळचा तो प्रसग मला चागला आठवतो आहे. गजानन माझ्याकडे आला होता. गभीरपणानं काही काही बोलत होता. प्रापचिक जबाबदाऱ्या-बद्दल आपल्या योजना सागत होता. भावाच्या शिक्षणाबद्दल, बहिणीच्या लग्नाबद्दल आपल्या कल्पना सागत होता. मी मोकळाच होतो. बोलता बोलता त्याने एकदम प्रश्न केला,

" कायमच्या कॉट्रॅक्टन माझी बहीण ठेवून घेणार काय ? "

मी चाट पडलो ! म्हटले, " गजा, तुला काही प्रसगाचं गाभीर्य, जिभेला काही वळणबिळण आहे की नाही ? "

" अरे, त्यात काय आहे ? नाही तरी लग्न म्हणजे काय रे ? पारपरिक शब्द काढून टाकले तर लग्नाचा हाच अर्थ नाही का ? उगीच मोठ्ठ बोलायच नाही ह—"

याच सुमाराला मी त्याच्याकडे गेलो होतो. दारातच म्हातारे बाजले टाकले होते. त्यावर पचा नेसलेले त्याचे वडील खराखरा अग खाजवीत बसले होते. सोप्याला एक मोकळे पोते अस्ताव्यस्त पडले होते. चिकट, उघड्या अगाचे एक पोर तिथेच काहीतरी चघळीत बसले होते. इतर मुले दंगा करीत होती. धूर आणि मुलाच्यावर खेकसल्याचा आवाज यावरून त्याची आई चुलीपुढे असावी असे वाटत होते. बाजल्यावर बसलेले गजाचे वडील मधूनच घाईघाईने आत जाऊन येत होते. उगीचच चोरून बावरल्यासारखे ते वागत होते. आणि धुरळा बसलेल्या अगठीतल्या खड्यासारखी गजाची थोरली बहीण अधूनमधून माजघरातल्या अधारात दिसत होती.

त्या वेळी गजाची स्थिति खरोखरच केविलवाणी होती. कित्येक रात्रीं भांडेभर पाणी पिऊनच मोठी माणसे दिसेल त्या कोपऱ्यात कलडत होतीं. अशा काळात गजानन बहिणीच्या लग्नाचा असा प्रयत्न करतो, हे कुणाला खरेंहि वाटणार नाहीं.

पण त्याच्या बहिणीचे नशीबच थोर! म्हणूनच एक दिवस तिचे लग्न ठरल्याची बातमी समजली; आणि लौकरच लग्न झाल्याचेहि कळले. बाकी काहीं का असेना, पण सुटली बिचारी असे सर्वांना वाटले. कर्तृत्वाच्या गप्पा मारायला गजाननला आणखी एक विषय मिळाला! तो त्याला चागला चार महिने पुरला.

तसा गजानन नशीबवान आहे. त्याला बोलायला नेहमी ताजे विषय मिळतात! मधल्या एका खेपेला तो आमच्याकडे चागला दोन-तीन तास बोलत बसला. बहिणीच्या सासऱ्याला छत्रीने का बडवला याचे समर्थन त्याने चालविले होते—" कोयनानगरला जाऊन बहिणीचा ससार थाटून दिला. पण चार महिन्यातच त्याच्या डोक्यावर परिणाम झाला! म्हणून मग त्याला गावी घेऊन आलो. नुसता शुभासारखा बसायचा! उठा, म्हटल्याशिवाय बसल्या जागेवरन उठायचाच नाही. पाणी प्या, म्हटल तर पाणी प्यायचा! जेवायला चला, म्हटलं तर जेवायला उठायचा! पानात वाढल्यावरसुद्धा तसाच बघत बसायचा. ह, जेवा आता, म्हटल की जेवायचा! भ्रमिष्ट च्यायला! दोन-दोन तास भातच चिवडींत बसायच! कावलो बघ मधू! तरी भागवत डॉक्टराची ट्रीटमेंट चालू केली होती. आणि रोज दोन–दोनशे घागरी पाणी घातल डोक्यावर! उगींच माझीं माणस होती राखलेली म्हणून घाटावरन दोन-दोनशे घागरी पाणी आल. त्याच्या खाद्याना घट्टे पडले. पण वासरू दगडावर थड बसायच! हू नाहीं कीं चू नाही! आम्ही सगळेच कावलो. आणि त्याच्या बापाच म्हणण, इथ आणल्यापासूनच त्याच जास्त झाल. सारखं कॅ—कॅ करायला लागल्यावर घेतली कोपऱ्यातील छत्री आणि काढला म्हाताऱ्याला बडवून! आता तूच साग मधू, माझ काय चुकल? माझच डोक फिरायची वेळ आली बघ. आता निवात जाऊन येतो आठपधरा दिवस ठासऱ्याला. पार्सल आहे न सध्या तिकडे!"

गजाननची ठासऱ्याची खेप झाली कीं नवरा-बायकोच्या भाडणाचा फोटो छान दिसतो! गजाननचे म्हणणे तिने नोकरी सोडून गावीं यावे. घरचे पाहावे. आपण शेती करावी. तिचे म्हणणे एवढी चागली सरकारी नोकरी सोडून खायचे काय? आणि शेती तुम्ही राखली आहे किती?

त्यावर गजानन सतापतो. म्हणतो, " तुला नवऱ्यापेक्षां नोकरी जास्त वाटते. पैसा जास्त वाटतो. " बायको समजूत घालायचा प्रयत्न करतें, " असच काही नाही. आपला जम बसेपर्यंत मी नोकरी करीन. मग फार तर सोडून देईन. "

" नवऱ्याच्या दारिद्याला कटाळणारी बायको पतिव्रताच नव्हे. "

आम्ही विषय बदलतो. कारण निर्णय काय घ्यावा असे तो आम्हाला विचारील अशी भीति वाटते.

एक दिवस गजाननच्या सोप्याला आम्ही बोलत बसलो होतो. गप्पा रगल्या होत्या. त्यामुळे रात्रीचे अकरा वाजून गेले तरी कुणाला भान राहिले नव्हते. मधले दार बद करून घरातली सगळी माणसे आत झोपली होती. त्यामुळे अगदी मनसोक्त गप्पा चाललेल्या होत्या. त्या दिवशी आम्हाला पत्ता लागला की, गजानन जीवनाविषयी गभीरसुद्धा बोलू शकतो ! सबध आयुष्याचाच आढावा घ्यायचे चालले होते, आणि त्यानेच शेवटीं आपला निर्णय दिला.

" मधू, आमचा बापच मूर्ख आहे ! त्याने जर इतक्या लहान वयात माझ्या हातात पैसा दिला नसता तर आजची स्थिति का आली असती ? "

रात्रीच्या शाततेत उच्चारलेले त्याचे शब्द आम्हाला फारच मोठ्यादा उच्चारल्यासारखे वाटले. दाराच्या आतच वडील झोपले होते. त्यामुळे आम्हा ऐकणारानाच सकोचल्यासारखे वाटले. म्हणून मी म्हटले, " अरे, बेतान. ऐकून बाहेर येतील ते एखादे वेळीं ! "

" ते काय आता बाहेर येतायत ! झोपली असतील दोघजण ! वरच्या तुळया पडल्या तरी ते बाहेर यायचे नाहीत ! आम्हा पोराना लाजून तरी आता—आयुष्यात त्याना काही कळलच नाही !... "

आणि आता गजानन नेटाने शेती करतो आहे. गावच्या राजकारणात लक्ष घालतो आहे. तो आता ग्रामपचायतीचा सरपच झाला आहे. एक कळकट, ओघळलेला नेहरू शर्ट, मळकट धोतर, तेलकट गाधीटोपी, हा त्याचा पोषाख. चेहरा उभट. नाक लाबट आणि दणकट. दात बत्तेचाळीस. पानतबाखूने त्याच्यावर आलेला रग शब्दात न सागता येण्यासारखा. त्याचा मूळचा गोरा रग त्याला साबणाची आघोळ घालूनच पाहिला

पाहिजे ! असे त्याचे आजचे रूप. कळकलेले. पोषाख कळकलेला. तरी पण तो ऐटीत पंचायतीच्या मीटिंग्ज घेतो आहे. भडाभडा बोलताना पानाच्या पचापच पिचकाऱ्या मारतो आहे. वाटते, हा जगाच्या तोंडावरच थुंकतो आहे—

पहिल्या मीटिंगलाच त्याने जाहीरपणे सांगून टाकले की, मी कुणालाहि गावात दारू पिऊ देणार नाही. चोर सापडला तर सरळ ठेवणार नाही. त्याच्या नेहरू शर्टाच्या डाव्या खिशात शेंगा असाव्यात तशी काडतुसे असतात. तो आता कुणालाच भीत नाही. तो आम्हाला सांगतो की, चाळीस हजार रुपये खर्च करून आपण जगाकडून अनुभव विकत घेतले आहेत. माणसे कशी असतात ते आपल्याला चांगले माहीत झाले आहे. आणि मग एकेक वेळेला प्रसंगच असे येतात की, देवानेच डोळे झाकून घ्यावेत—

अशा तऱ्हेने आज गजाननच्या टोपीतून तुरा उगवलेला आहे ! आपल्या घरच्या जमिनीलाहि त्याने चांगले वळणीवर आणले आहे. तीहि अगदी सरसरून पिकते आहे. एका तळाला साडेपाच एकर ऊस धरणी फोडून काळ्याभोर ऐटीत उभा आहे. तणावाऱ्यालाहि तो जुमानीत नाही. यंदा त्याचे आठ हजार रुपये गजानन टिच्चून घेणार आहे.

पण या उभ्या उसावरच गजाने आत्ताच दहा हजार रुपये कर्ज करून ठेवले आहे !

□ □ □